


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २५ वें, अंक १०७ ] [ आक्टोबर-नव्हेंबर-डिसेंबर १९५३

## १०७

### भोळया सांबास—

सुरासुरांनी लुटलीं रत्नें
हलाहलाचा तुजला प्याला
दिव्य अप्सरा इतरांसाठी
तव वांट्याला भिल्लिण बाला !
भव्य मंदिरें लादुनि सगळीं
तुला धाडिती स्मशान-स्थानां
पालन-पोषण अन्या हातीं
संहारावर तुझी योजना !
हंसगरुडशीं कुशल वाहनें
सुखसेवेला घेऊनि आपुल्या
खास ठेविलें राखुनि एकच
तुजसाठीं या मद्दड बैला !
डावपेंच हे करुनी म्हणती
' पशुपति आमुचा खराच भोळा '
हितशत्रूंना ओळख या रे,
पहा उघडुनि तिसरा डोळा !

—गो. म. कुळकर्णी.

### नवें जुनें—

अजुनि तेच सूर घुमति, अजुनि तेंच गाणें
अजुनि चिंतनेंहि तींच, तेच ते वहाणे !
आशेचे अंध खेळ-तीच सौख्य छाया
प्रेयाची पाठशिवी तिमिर तेज माया
अजुनि अंतरेंहि तींच उमलत्या फुलांचीं
येणारी चाहुल ती कालपावलांचीं
तशींच चालली अजून पारध नवहरिणींची
नीतीच्या बतावणींत प्रीतीचीं पुराणें

नवें जुनें न कांहिही—पुरातनांतही नवें
नव्यांतलें सनातनी नित्य जें नवें नवें
सूर्य काय कालचा आज जाहला शिळा
गीत तें नवें न काय गाइ रानकोकिळा
नांव राखती नवें जुन्यास नांव ठेउनी
हवेत नांव घ्यावयास तेच ते उखाणे

—राजा बढे.





## हुरहुर —

जेव्हा असीम व्योमसागराच्या निळ्या जलांत
उफाळून येती निळे शिंपले !
संध्येच्या तरल मादक श्वासाच्या मधुर स्पर्शाने
उमलूं लागतां
सहस्रावधि मोत्यांच्या तेजाने
झगमगूं लागे विशाल सागर !
सर्वस्व अर्पूनी तद्रूप झालेली
आकाशगंगा !
जेव्हा डौलाने मिरवूं लागते
देवस्त्रियांच्या कोमलकरांनी
कंपित होऊनि उज्ज्वल झालेले
रत्नजडित सुवर्णदीप !
तेव्हा विस्मृतीच्या टेकड्यांवरून
जाणीवेच्या सांद्र मेघावलींतून
स्मृतिविहंग !
निजपंखांची श्रांत फडफड करीत येती
विश्रान्ति घ्यावया
माझ्या मनाच्या मूक कोटरांत !
कोणी कण्हती उसासे टाकीत
कांहींच्या मोकळ्या कंठीं जागी झाली
तृप्तीची लकेर !
मिटूं लागलेल्या त्यांच्या नेत्रपातीं
दंवबिन्दूसम
तरळती माझ्या सुखाचे क्षण दुःखाचे क्षण
विरूं लागला त्यांत देहाचा कण नि कण
परि हेंहि सुख
मज दीर्घकाळ नाही लाभणार !
रात्र संपणार !
पहांट होणार !!

— माधव गोविंद काटकर.

अनुक्रमणिका

## भारतीय साहित्य :

भा. वि. वरेरकर

परदेशांतील साहित्याशीं तुलना करतांना भारतांतील सर्व भाषांतील साहित्याची संख्या उणी पडते असें दिसून येतें. भारतांत आमच्या घटनेने निश्चित केलेल्या चौदा भाषा आहेत. या साऱ्याच भाषांतून विपुल साहित्य निर्माण होत आहे असें म्हणतां यायचें नाही. हिंदी ही आज राष्ट्रभाषा झालेली असली तरी तिच्यांतील साहित्याची संख्या फारशी अभिमानास्पद नाही. साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने बंगालं सर्वांच्या पुढे आहे. तिच्या खालोखाल मराठीचा नंबर लागेल. तमीळ भाषेनेहि अलीकडे बरीच प्रगति केली आहे. आणि बंगाल व महाराष्ट्र या दोन्ही प्रांतांशीं टक्कर देण्याची त्यांची तयारी दिसते. गुजराती साहित्यालाहि दिवसेंदिवस चांगलाच जोर येत आहे. कन्नड भाषेंत ब्रिटिशपूर्वकालीन साहित्य विपुल असलें तरी आधुनिक दृष्टीने त्या भाषेंतील साहित्याची प्रगति आता आता वाढत चालली आहे. इतर ज्या भाषा आहेत, त्या भाषांतील साहित्याची निर्मिति आताच कुठे सुरू झाली आहे असें म्हटलें तर तें चुकीचें होणार नाही.

इंग्लंड हा देश आपल्या मुंबई राज्यापेक्षा फारसा मोठा नाही. त्या देशाच्या वसाहतींचें क्षेत्रफळहि आपल्या लहानलहान राज्यांइतकेंच आहे. पण इंग्रजी भाषेंतील साहित्याने जगांतील सर्व साहित्यावरं मात केली आहे. अमेरिकेंतील साहित्याची पहिल्या महायुद्धाच्या नंतरच्या काळापर्यंत आम्हांला ओळखसुद्धा नव्हती. पण पहिलें आणि दुसरें महायुद्ध यांच्या मधल्या काळांत विशेषतः दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत अमेरिकन साहित्याचा प्रसार फार मोठ्या प्रमाणांत होऊं लागला. तरीहि दर्जाच्या दृष्टीने पाहिलें तर अजूनहि इंग्रजी साहित्याचा दर्जा अमेरिकन साहित्यापेक्षा तुलनेने कमी झालेला नाही. संख्येच्या दृष्टीने मात्र अमेरिकेने साहित्य-निर्मितींत सर्व राष्ट्रांवर ताण केली आहे असें दिसून येतें. आणि म्हणूनच या सर्व इंग्रजी साहित्याच्या संख्येच्या दृष्टीने क्षेत्रफळाने आणि लोकसंख्येने मोठा असलेला भारतदेश अजूनहि मागे कां राहिला आहे याचें आश्चर्य वाटतें.

भारतांतील कोणत्याहि भाषेपेक्षा हिंदी भाषिकांची संख्या सर्वांत मोठी आहे. दिल्ली, उत्तरप्रदेश, बिहार, पंजाब हीं चार राज्यें सर्वस्वीं हिंदी भाषिकांचीं आहेत. असें असूनहि या राज्यांतील साहित्यनिर्मिति बंगालच्या तोडीला आली आहे असें दिसत नाही. किंबहुना विशिष्ट दर्जाच्या साहित्याची हिंदी भाषेंतून जी निर्मिति झाली आहे, ती बंगाली साहित्याच्या अनुवादां-मुळे. या दृष्टीने स्वतंत्र साहित्याच्या निर्मितींत महाराष्ट्र या सर्व हिंदी राज्यांपेक्षा पुढे आहे असें दिसून येईल.

इंग्रजांच्या राजवटींत प्रांतिक भाषांना महत्त्व नव्हतें. राज्यभाषा इंग्रजी होती–आजहि राज्यभाषा इंग्रजीच आहे–अशी प्रतिकूल परिस्थिति असतांहि देशी भाषा–विशेषतः बंगाली आणि मराठी या भाषा साहित्यनिर्मितींत अग्रेसर राहिल्या होत्या. आजहि त्या तशाच आहेत. इंग्रजांच्या राजवटींत सुरवातीच्या काळांत इंग्रजी साहित्याखेरीज इतर युरोपीय साहित्याची भारताला फारशी ओळख नव्हती. पहिल्या महायुद्धानंतर इंग्रजेतर युरोपीय राष्ट्रांच्या साहित्याकडे भारताची नजर वळूं लागली. इंग्रजेतर युरोपीय भाषा परिचित नव्हत्या, तरीहि या राष्ट्रांतील साहित्याच्या इंग्रजी अनुवादांकडे आपली नजर वळली आणि तीमुळे दृष्टीहि

व्यापक होऊं लागली. वेगवेगळ्या तत्त्वज्ञानांच्या निर्मितीचा हा काळ होता. जुनीं देवळें मोडून नवीं देवळें जशीं उभारलीं जात होतीं, तशीच जुन्या देवळांची डागडुजी करून त्यांना नवें स्वरूप देण्यांत येत होतें. या जागतिक उत्क्रांतीचा प्रभाव भारताला जाणवूं लागला आणि भारतीय साहित्यनिर्मितीवरहि त्याचा परिणाम होऊं लागला. इंग्रजी साहित्याखेरीज जगांत इतर साहित्य आहे, आणि तें साहित्य इंग्रजी साहित्यापेक्षा कोणत्याहि प्रकारें कमी दर्जाचें तर नाहीच, उलट स्वतंत्र विचारांच्या आणि तंत्राच्या दृष्टीनें इंग्रजीपेक्षा वरचढ आहे हें भारतीयाला जाणवूं लागलें.

या जाणिवेचा जो परिणाम व्हायला हवा होता, तो मात्र झाला नाही. या परदेशीय साहित्याच्या तोडीला तोड देणारें स्वतंत्र विचाराचें आणि तंत्राचें साहित्य निर्माण करण्या-ऐवजी भारतीयांनी या परदेशीय साहित्याला माथ्यावर घेऊन नाचायला सुरवात केली या गुलामी वृत्तीच्या मुळाशीं एकप्रकारचा न्यूनगंड होता. त्या साहित्यानें आम्हीं दिपून गेलों होतों. बुद्धिमत्तेच्या दृष्टीनें जगांतील कोणत्याहि देशापेक्षा जास्त समर्थ असलेल्या भारतीयांच्या ठायीं परकीय राजसत्तेच्या दडपणामुळे ही न्यूनगंडाची वृत्ति निर्माण झाली होती. आणि आज स्वातंत्र्याच्या काळांत देखील ती नाहींशी झाली आहे, असें वाटत नाही.

जगाच्या लोकसंख्येच्या दृष्टीनें पाहातां इंग्रजी भाषिकांची संख्या भारतीय इंग्रजी भाषिक धरूनहि सात ते आठ टक्क्यांपेक्षा जास्त होत नाही. असें असूनहि साऱ्या जगाला मागे टाकण्याइतकी इंग्रजी साहित्याची निर्मिति कां होत आहे याचा विचार अजून झालेला नाही.

इंग्रजी साहित्यनिर्मितीच्या या भूमिकेमागील परिस्थिति आपण लक्षांत घेतली म्हणजे भारतीय साहित्याची संख्या इंग्रजी साहित्याच्या तोडीला येणें कठीण जाणार नाही. इंग्रजी साहित्यांतले सारेंच ग्रंथ कांही इंग्रजांनी लिहिलेले नाहीत. इतर युरोपीय भाषांतील ग्रंथांच्या अनुवादांमुळे इंग्रजी साहित्याला जसें वैभव प्राप्त झालें आहे तशीच तंत्रदृष्ट्या त्यांत प्रगतीहि झाली आहे. इतर भाषांचे अनुवाद उपलब्ध झाल्यामुळे त्या वेगवेगळ्या भाषा शिकण्याचा बोजा इंग्रजांना उचलावा लागला नाही. एकच उदाहरण द्यायचें तर इंग्रजी नाट्यसाहित्याकडे पहा. पहिल्या एलिझाबेद राणीच्या कारकीर्दींत अनेक नाटककार झाले होते, पण शेक्सपीअरनें त्या सर्वांना काळोखांत लोटलें. शंभर वर्षांपूर्वी इब्सेनचीं नाटकें ज्यावेळीं इंग्रजी भाषेंत अनुवादित झालीं, त्यावेळीं शेक्स्पीअर एकदम मागे पडला. पिनरो, जोन्स्, आर्ल्चर, ग्रॅनव्हील बारकर प्रभृति नाटककारांनी इब्सेनच्या तंत्राचा आश्रय केल्यामुळे इंग्रजी रंगभूमीवरून शेक्स्पी-अरचें उच्चाटन झालें. मोलीयरनें आधीच इंग्रजी नाट्यसाहित्याला धक्का दिला होता. नंतर या फ्रेंच आणि स्कँडिनेव्हियन नाटककारांच्या प्रभावानें इंग्रजी नाट्यसाहित्याला व्यापून टाकलें. उपन्यासाच्या क्षेत्रांतहि असाच परिणाम झाला असल्याचें दिसून येतें. लघुकथेच्या तंत्रावरहि इंग्रजेतर लेखकांची जी इंग्रजी लेखकांवर छाप बसली, तीहि त्या त्या भाषेंतील उपन्यास आणि लघुकथा इंग्रजींत अनुवादित झाल्यामुळे. नुसत्या इंग्लंडांत निर्माण झालेल्या साहित्याच्या तुलनेनें स्वतंत्र निर्मितीच्या दृष्टीनें इंग्रजेतर साहित्यच जास्त स्वयंप्रकाशी होतें आणि त्याचा परिणाम इंग्रजी साहित्यावर झाल्याचा इंग्रज लेखकांनी विषाद मानला नाही; म्हणूनच इंग्रजी साहित्याला जगाच्या इतिहासांत अव्वल दर्जाचा मान मिळाला.

इंग्रजांची ही सर्वग्राही आणि सर्वंकष वृत्ति भारतीयांनी अनुसरली तरच भारतीय साहित्याला वैभव प्राप्त होईल. भारत हा बहुभाषी देश आहे. या देशांतील प्रत्येक प्रांताचे

आचारविचार, चालीरीति, राहणी, पोषाख हे भिन्नभिन्न प्रकारचे आहेत. वेगवेगळ्या प्रांतांची मनोभूमीहि भिन्न असल्याचें दिसून येतें. हा भारतीय प्रांतांचा वृत्तिभेद भारताच्या अखंडत्वाला आज आड येत आहे. आज आपल्याला इंग्रज लेखक माहीत आहेत; फ्रेंच, जर्मन, रशियन लेखक माहीत आहेत; अमेरिकन लेखकहि आपल्या ओळखीचे झाले आहेत; पण हिंदी लेखकाला गुजराथी लेखकाची ओळख नाही, मराठी लेखकाला कानडी, तेलगू, तमीळ प्रभृति दाक्षिणात्य लेखकांची ओळख नाही, आणि बंगाली लेखकाला तर बंगालीखेरीज दुसऱ्या कोणत्याच लेखकाची ओळख नाही. परदेशीय साहित्याचा डांगोरा पिटतांना घरचा शेजारी अपरिचित राहिला आहे. हें लक्षण आत्मघातकीपणाचें आहे. आता भाषावार प्रांतरचनेचें जें आंदोलन सुरू झालें आहे त्यामुळे तर हे सर्व प्रांत एकमेकांपासून पूर्णपणें दुरावतील. मराठी राज्यांत मराठी, गुजराथी आणि कन्नड अशा तीन भाषा असल्यामुळे या तिन्ही भाषांत सलोख्याचें नातें आहे. या तिन्ही भाषांत साहित्याचें--आदान प्रदान होत आहे. दाक्षिणात्यांच्या चारी भाषांतहि आजवर सलोख्याचें नातें होतें पण तेलगु-भाषिक आपला स्वतंत्र प्रांत करावयाला सरसावल्यापासून ते तिथल्या इतर तिन्ही भाषांपासून अलग होऊं पाहाताहेत. राजकारणापेक्षा भाषाकारण हें किती महत्त्वाचें आहे याची कल्पना नसल्यामुळे साहित्याच्या क्षेत्रांत भाषाभिन्नत्वामुळे जी फुटीर वृत्ति निर्माण होऊं पाहात आहे ती भारताच्या अभ्युदयाला पायबंद घालायला कारणीभूत होणार आहे.

ही जाणीव वेळींच न झाली तर भारतीय संस्कृतींत एकता निर्माण होणार नाही. भारताच्या भिन्नभिन्न प्रांतांतल्या भिन्नभिन्न भाषिकांना एकत्र आणल्याशिवाय भारताचें सांस्कृतिक एकीकरण अशक्य होईल. आज आपल्या घटनेने हिंदी ही राष्ट्रभाषा ठरवली आहे. ही राष्ट्रभाषा असलेली हिंदी म्हणजे कोणत्याहि विशिष्ट प्रांताची अगर प्रांतांची भाषा नव्हे. ती साऱ्या भारताची राष्ट्रभाषा आहे. या दृष्टीनेच त्या भाषेची रचना आणि घटना झाली पाहिजे. हें अखिल भारतीय स्वरूप येण्यासाठी भारतांतील प्रत्येक भाषेंतील सर्व प्रकारच्या सर्व साहित्याचा अनुवाद या राष्ट्रभाषेंतून झाला पाहिजे अशा रीतीने सर्व भाषांतील ग्रंथ राष्ट्रभाषेंत आले म्हणजे इतर भाषिकांना आपापल्या भाषेंत त्यांचा अनुवाद करणें सुलभ होईल. आज प्रत्येक भाषिकाला भारतांतील इतर प्रत्येक भाषा शिकणें शक्य नाही. भारताची एकच राष्ट्रभाषा जोंपर्यंत अस्तित्वांत नव्हती तोंपर्यंत साऱ्या भारतीय भाषा एका साहित्यपीठावर येणें शक्य नव्हतें. इंग्रजी भाषा ही ज्यावेळीं आपली राजभाषा होती, त्यावेळीं आपापल्या भाषेंतील साहित्य इंग्रजींत आणण्याचा प्रयत्न कुणी केला नाही, आणि त्यामुळे भारताच्या बाहेर भारतांतील भिन्नभिन्न भाषांतील साहित्याचा प्रसार आणि प्रचारहि झाला नाही. आता भारताची राष्ट्रभाषा एकत्र झाल्यामुळे भिन्नभिन्न प्रांतांतील सर्व भाषिकांना ती अवगत होणें अवश्य झालें आहे. या आवश्यकतेंतूनच भारतांतील सर्व भाषांतील साहित्य सर्वत्रांना परिचित होणें शक्य झालें आहे. याचा फायदा आज आपण घेतला पाहिजे.

हिंदी भाषा ही आज आपली राष्ट्रभाषा झाली आहे. आजवर एका बंगाली भाषेखेरीज इतर भारतीय भाषांतले ग्रंथ या भाषेंत क्वचितच अनुवादित झाले आहेत. गुजराथी, मराठी, बंगाली आणि हिंदी या चारी भाषांचें स्वरूप एकमेकींपासून फारसें भिन्न नाही. यांत पंजाबीचाहि समावेश करतां येईल. या भाषाभगिनींचा संसार एका घरांत होणें अशक्य नव्हतें. पण त्या दृष्टीने आजवर कुणी प्रयत्न केले नाहीत. अर्थात् या भाषांपेक्षा रचनेच्या आणि लिपीच्या दृष्टीने अगदीच वेगळ्या असलेल्या कन्नड, तेलगु, मल्याळम्, तमीळ या

भाषा सर्वस्वी अपरिचित राहिल्या यांत आश्चर्य नाही. सार्वत्रिक दृष्टीने भारतांतील सर्व भाषा एकत्रित करण्याचा जो प्रयत्न आजवर झाला नव्हता, तो प्रयत्न करणें आता सुलभ झालें आहे आणि म्हणूनच हिंदी या राष्ट्रभाषेंत भारतांतील इतर सर्व भाषांतील साहित्याचे अनुवाद झाले पाहिजेत. युरोपीय भाषांतील साहित्याच्या अनुवादामुळे इंग्रजी भाषेला जें वैभव प्राप्त झालें, तंत्रदृष्टया जी विविधता आली, सांस्कृतिकदृष्टया जी एकता आली, तें उदाहरण नजरेसमोर ठेवलें तर भारतीय भाषांतील साहित्याचे अनुवाद हिंदी भाषेंत झाले तर वैभवाच्या दृष्टीने हिंदी भाषा इंग्रजीलाहि मागे टाकायला समर्थ होईल. मग हिंदी भाषेंतील हें सामुदायिक साहित्य इंग्रजी प्रभृति परदेशीय भाषांतून अनुवादित करणें कठीण जाणार नाही.

पण भारतीय भाषांतील साहित्य जागतिक स्वरूपांत प्रसृत करण्यासाठी आधी हिंदींत त्याचे अनुवाद झाले पाहिजेत. भारतीय भाषांचा ज्यांना परिचय आहे त्यांना या सर्व भाषांतील साहित्य इंग्रजी अगर इंग्रजीतर साहित्यापेक्षा कोणत्याहि प्रकारें कमी नाही, याचा प्रत्यय आला असला पाहिजे. परकीय सत्तेच्या दडपणाखाली आजवर भारतीय साहित्य चुरडून गेलें होतें. आमच्याच न्यूनगंडामुळे आम्ही भारतीय साहित्याकडे उपेक्षेच्या दृष्टीने पाहात होतों आणि इंग्रजी साहित्याचे गोडवे गात होतों. इंग्रज गेला असला तरी इंग्रजी भाषा अजूनहि आमची पकड धरून बसली आहे. ती पकड जोराने झटकून दिल्याशिवाय भारतीय साहित्याला त्याचें उचित स्थान मिळणार नाही.

भारतांतील चौदा भाषांतील साहित्याचा विनिमय सुरू झाला तर भारतीय साहित्य तंत्राच्या, वैचारिकतेच्या, रचनाकौशल्याच्या आणि सांस्कृतिक प्रगतीच्या दृष्टीनें एवढें विराट स्वरूप धारण करील, की त्यापुढे जगांतली इतर कोणतीहि भाषा टक्कर द्यायला समर्थ होणार नाही.

भारतीय साहित्याची ही चौदापट अस्तित्वांत आली तर संख्येच्या दृष्टीनेहि भारतीय साहित्य जागतिक साहित्याला मागे टाकायला समर्थ होईल.

पण यासाठी आधी भारतांतील तेरा भाषांतील साहित्य हिंदी भाषेंत अनुवादित करून आणायची सुरवात झाली पाहिजे. ही सुरवात जितक्या लौकर होईल, तितक्या लौकर भारतीय साहित्य समृद्ध होईल आणि अपेक्षित भाषावर प्रांतरचनेमुळे भिन्नभिन्न भाषिक प्रांत एकमेकांपासून दुरावण्याची जी भीति आज साहित्यिकांना वाटत आहे तीहि आपोआप टळेल.

---

अनुक्रमणिका

# अर्थविज्ञान आणि मराठी भाषा

## लेखांक २ रा

उषा पोतदार ( घाटे ) एम्. ए. व शं. गो. तुळपुळे
( मराठी विभाग, पुणें विद्यापीठ )

**शब्दाचा अर्थ कां बदलतो ?—**

मागील भागांत सामाजिक संकेताविषयी लिहितांना वक्ता व श्रोता यांमधील संवादाची आवश्यकता आपण विचारांत घेतली. विचारांच्या देवघेवीस अत्यावश्य असा हा उभयतांमधील संकेत ढळला की तेथे विसंवाद निर्माण होतो, व त्यांतूनच अर्थाचा बदल संभवतो. बोलणारी व्यक्ति व ऐकणारी व्यक्ति यांच्या भूमिकांत अंतर पडेल तरहि अर्थ-दृष्टया एक प्रकारची विसंगति निर्माण होते. ' अमुक एक गृहस्थ नुकतेच गेले ' असें साधें विधान बोलणारा करतो; पण ऐकणारा मात्र आपल्या भिन्न मनोभूमिकेमुळे ' ते वारले ' असें समजून व्यर्थ दुःखीकष्टी होतो. म्हणजे वक्ता व श्रोता यांमधील वैचारिक विसंवाद हें शब्दाच्या अर्थांत बदल होण्याचें एक सर्वसामान्य कारण होय. तसेंच, दोन वस्तूंचें, विचारांचें किंवा कल्पनांचें साहचर्य (association) शब्दाचा अर्थ पालटूं शकतें. हें साहचर्य तीन प्रकारचें असतें. ' काय बाजार भरला आहे ! ' असें आपण म्हणतों तेव्हा प्रत्यक्ष बाजार भरलेला नसूनहि बाजाराशीं संबद्ध असणारी जी धांदल व गडबड ती आपल्या मनांत कल्पनेच्या साहचर्याने येते व त्यामुळे बाजार या शब्दाची व्याप्ति नकळत वाढते. हें कल्पनेचें साहचर्य होय. दुसरा प्रकार निकटत्वजन्य साहचर्याचा. रत्नहार कंठांत घातला जातो म्हणून त्यास 'कंठी' म्हणणें, किंवा आवाज गळ्यांतून निघतो म्हणून 'गोड गळा' वाखाणणें, किंवा आमंत्रण अक्षतपूर्वक दिलें जातें म्हणून ' अक्षत देणें ' असा वाक्प्रचार आमंत्रण देणें या अर्थीं वापरणें, हीं सर्व निकटत्वजन्य साहचर्याचीं उदाहरणें होत. तिसऱ्या प्रकारांत सादृश्य-जन्य साहचर्य ( association by similarity ) येतें. फारसींत अनार या शब्दाचा अर्थच डाळिंब असा असल्याने डाळिंबाच्या बियांप्रमाणे दिसणाऱ्या एका धान्यास ' अनारदाना ' म्हणणें किंवा देवळांतील पाण्याच्या वाहणीस तिच्या आकारावरून ' गायमुख ' या शब्दाने संबोधणें, हीं सादृश्यजन्य साहचर्याचीं उदाहरणें होत. शब्दाच्या अर्थांत परिवर्तन जसें साहचर्यामुळे तसेंच दोन वस्तूंमधील साम्यामुळेहि होतें. या साम्यतत्वासच इंग्रजींत analogy असें म्हणतात. अर्थविस्तार व अर्थसंकोच हीं दोन अर्थविषयक परिवर्तनें या साम्यतत्वांतून निर्माण होतात असें ब्राएल यांचें म्हणणें आहे. साम्यतत्वामुळे शब्दाच्या अर्थामध्ये जो बदल होतो त्याचेहि दोन स्थूल प्रकार कल्पितां येतात. कित्येकदा, कांही पौराणिक किंवा ऐतिहासिक किंवा वाङ्मयीन व्यक्ति आपल्या वैशिष्टयांमुळे इतक्या विख्यात होतात, की त्यांचें व्यक्तिगत स्वरूप नाहीसें होऊन त्यांना सर्वसामान्य रूप प्राप्त होतें. म्हणजेच अशा प्रसिद्ध व्यक्तींचीं नांवें हीं विशेषनामें न राहतां तीं सामान्यनामें, क्वचित् विशेषणेंहि होऊन बसतात. कधीकधी मूळ व्यक्ति सुविख्यात असली तरी काळाच्या ओघांत तिचें जें सामान्यीकरण होतें त्यांत मूळचा चांगला अर्थ वाईट होतो. संत तुकाराम किंवा दानशूर चंदूलाल हीं अशा प्रकारचीं उदाहरणें होत. या व्यक्ति अनुक्रमें साधुत्व व दानशूरत्व यांसाठी प्रसिद्ध असल्या तरी आज या नांवांचे अर्थ अनुक्रमें भोळेपणा व ख्यालीखुशाली या कल्पनांशीं संबद्ध होऊन बसले आहेत. दुसरे बाजीराव, घाशीराम कोतवाल, हिटलर इत्यादि शब्दांचे

अर्थ वाईट झालेले नसले तरी त्यांतील अर्थविस्तार हा साम्यतत्वजन्यच म्हटला पाहिजे. दोन भिन्न गोष्टींमधील सादृश्य किंवा विरोध विशेषत्वाने सूचित करण्याच्या प्रयत्नांतहि साम्यतत्वाच्या प्रभावामुळे अर्थपरिवर्तन होऊं शकतें. या प्रकारचीं उदाहरणें मराठींत हवीं तेवढीं मिळतील. ' घटसर्प ' आणि 'घिसाडघाई' हे शब्द पहा. ज्या रोगांत घटास म्हणजे घशास सर्पाचा विळखा पडावा त्याप्रमाणें सूज येते त्या रोगास 'घटसर्प' म्हटलें गेलें. लोखंड-काम करणाऱ्या घिसाड्याला लोखंड तापलेलें आहे तोंवरच घाई करून त्यावर घाव घालावे लागतात. यावरुन ' घिसाडघाई ' म्हणजे घाई-गर्दी असा वाक्प्रचार रूढ झाला; इतकेंच नव्हे, तर मूळांत नसलेला किंचित् वाईट असा अर्थ त्याच्या अंगीं आला. ' गवती चहा ' हा शब्दप्रयोगहि पाहण्यासारखा आहे. तयार करण्याची कृति व तयार झाल्यावर त्यास येणारें रंगरूप या दोन्ही बाबतींत साध्या चहाशीं विलक्षण साधर्म्य असल्यामुळे या औषधी वनस्पतीस हें नांव रूढ झालें असावें. तात्पर्य, अर्थपरिवर्तन घडून येण्यांत साम्यतत्वाचा प्रभाव स्पष्ट दिसतो.

रूपकजन्य अर्थप्रक्रिया—

रूपक ( metaphor ) हेंहि शब्दाचा अर्थ बदलण्यास अनेकदा कारणीभूत होतें. इतकेंच, की व्यवहारांत आपण रूपकाचा आश्रय पदोपदीं करीत असूनहि केवळ अतिपरिचया-मुळे या गोष्टीची जाणीव आपणांस होत नाही. वास्तविक पाहतां हें साम्यमूलक रूपक शब्दार्थांत बदल घडवून आणण्याची व नवेनवे वाक्प्रचार निर्माण करण्याची क्रिया अप्रतिहतपणें करीत असतें. कित्येकदा एखाद्या रूपकाच्या उगमाची स्मृति इतकी अंधुक होऊन जाते, की मूळ उपमेय कोणतें याविषयी मनोरंजक प्रमादहि घडतात. अर्धोन्मीलित कळ्यांना पर्ल्स् म्हणजे मोती म्हणणें हें अडाणी शेतकऱ्यांना कसें शक्य झालें याचें सिसेरोला आश्चर्य वाटलें. पण मोत्यांनाच त्यांचें नांव अर्धवट उमललेल्या कळ्यांवरून मिळालेलें आहे ही वस्तुस्थिति ध्यानांत घेतल्यास वरील प्रकारांत आश्चर्य वाटण्याचें कारण उरणार नाही. रूपकाचा वेग व त्याची गति हीं इतकीं अनिरुध्द असतात, की कधी एका भाषेंतून दुसरींत, एका देशांतून दुसऱ्यांत याप्रमाणे त्यांचा प्रवास सुरू असतो. ' आयुष्य ही पुष्पशय्या नव्हे, ' ' काटेरी मुकुट ' ' चहाच्या पेल्यांतील वादळ ' ' पांढरा हत्ती ' किंवा ' पर्यंक—पंडित ' यांसारखीं आज मराठींत रूढ झालेलीं रूपकें मूळचीं इंग्रजी भाषेंतील असल्याचें आपणांस ठाऊकच आहे. कांही रूपकें ते ते व्यवसाय करणाऱ्या व्यावसायिकांनी भाषेस दिलेलीं असतात. शेतकरी आणि कामकरी, सुतार आणि लोहार, सोनार आणि कुंभार, वैद्य आणि वकील, शिक्षक आणि भिक्षुक अशा अनेकांनी आपापल्या व्यवसायांतील रूपकें देऊन भाषेस समृद्ध केलें आहे. प्रा. श्री. म. माटे यांनी केलेली ' भाषाभिवृद्धीची सामाजिक मीमांसा ' प्रसिद्धच आहे. हीं रूपकें त्या त्या व्यवसायाच्या मर्यादित क्षेत्रांतून व्यापक अशा समाजजीवनांत उतरतात तेव्हा त्यांतील मूळचा अर्थ निश्चितपणें वाढतो. उदा. ' कुंभाराचा आवा उतरणें ' याचा मूळचा अर्थ त्याचीं मडकीं भट्टींत भाजून निघणें; परंतु आज हें रूपक आपलीं सर्व मुलेंबाळें जगून तीं लहानाचीं मोठीं होणें अशा व्यापक अर्थी वापरलें जातें. ' इरेस पडणें ' हा वाक्प्रचार मूळचा बुद्धिबळाच्या खेळांतील. परंतु आज त्याचें रूपकांत रूपांतर झालें असून त्यांतील अर्थहि अधिक विस्तृत झाला आहे. वरील रूपकें जशीं सामाजिक, तशींच कांही ऐतिहासिकहि असतात. त्यांतून पूर्वेतिहासांतील कांही रोमहर्षक घटनांचें दर्शन

आपणांस घडूं शकतें. 'अटकेपार जाणें' किंवा 'उंट घालणें' यांसारखे वाक्प्रचार आणि 'गनिमी कावा,' 'भाऊगर्दी,' किंवा 'अनागोंदीचा कारभार' यांसारखे शब्दप्रयोग आज अगदी निराळ्या अर्थानें रूढ असले तरी त्यांतील रूपकभाव स्पष्ट असून तो आपल्या ऐतिहासिक स्मृतीला उजळा देतो यांत शंका नाही. कांही रूपकांतून अचेतन वस्तूंवर सचेतनत्वाचा, तर कांहींत एका इंद्रियावर दुसऱ्या इंद्रियधर्माचा आरोप केला जातो व त्यामुळे अर्थविस्तार संभवतो. 'अदमुरें चांदणें,' 'अंधकूप,' 'आंधळा न्याय,' 'वाहता रस्ता,' 'जिवंत पाणी,' 'मेलेलें अन्न' इत्यादि मराठी शब्दप्रयोगांतील अर्थपरिवर्तन या प्रकारचें आहे. कित्येक रूपकें आपली कक्षा विस्तृत करून जेथे म्हणून सादृश्य आढळेल अशा सर्व गोष्टी आपणांमध्ये अंतर्भूत करतात. या दृष्टीने 'गुलजार' (< फा. गुलझार् = पुष्पवाटिका) या शब्दांतील रूपकभावामुळे झालेला अर्थविस्तार पाहण्यासारखा आहे. एकाद्या विशिष्ट दृष्टिकोणांतून पाहणें या अर्थी जेव्हा आपण 'अमका चष्मा लावणें' असा वाक्प्रचार वापरतों तेव्हा त्यांतहि रूपकमूल अर्थविस्तारच असतो. सारांश, रूपक अर्थपरिवर्तनास नानापरींनी हातभार लावतें.

### लक्षणाजन्य अर्थप्रक्रिया—

लक्षणा हेंहि एक महत्त्वाचें अर्थपरिवर्तक आहे. शब्दाच्या अंगीं असणाऱ्या अभिधा, लक्षणा व व्यंजना या तीन शक्तींपैकी लक्षणाशक्ति ही अर्थप्रक्रियेच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे. कोणत्याहि शब्दाचा लक्ष्यार्थ मनांत येण्यास (१) मुख्यार्थबाध, (२) 'तद्योग' किंवा मुख्यार्थाचा लक्ष्यार्थाशीं अवश्य असा संबंध, व (३) लक्षणेमागील 'प्रयोजना'ची आवश्यकता अशा तीन गोष्टी जरूर असतात हें आपणांस ठाऊकच आहे. येथे लक्षणेचा विचार एक अर्थपरिवर्तक म्हणून करणें असल्यान तिचें तात्त्विक विवेचन करण्याचें कारण नाही. लक्षणा मुख्यतः दोन प्रकारची असते, एक प्रयोजनवती व दुसरी निरूढा. लक्षणेमधील 'मुख्यार्थबाध' हा या दोन्ही प्रकारांस समान असला तरी एकांत तो स्पष्ट असतो, तर दुसऱ्यांत तो गूढ असतो. तेव्हा या दोन प्रकारांतून दोन प्रकारच्या अर्थप्रक्रिया संभवतात. 'मीं तुकाराम वाचला' व 'तुका जालासे कळस' या दोन वाक्यांतील तुकाराम व तुका या शब्दांचे अनुक्रमें तुकारामाची गाथा व तुकारामाचें कार्य किंवा कर्तृत्व हे लाक्षणिक अर्थ जेव्हा मनांत येतात तेव्हा मुख्यार्थबाध उघड असतो. ही झाली प्रयोजनवती लक्षणा. याच्या उलट, कित्येक शब्दप्रयोगांत प्रयोजनाची अतिपरिचयामुळे अवज्ञा होते व कालांतराने तें प्रयोजन स्मरणांतून पूर्णपणें जातें. म्हणजे या लक्षणाप्रकारांत प्रयोजन असें उरतच नसल्याने तिला निरूढा म्हटलें जातें. उदाहरणार्थ, 'कुशल' (< सं. कुश=दर्भ+ल) या शब्दाचा आजचा वाच्यार्थ निष्णात किंवा प्रवीण असा असला तरी तो मूळचा त्याचा लक्ष्यार्थच आहे. म्हणजे येथे 'दर्भ तोडणारा' हा मूळचा अर्थ जाऊन निष्णात किंवा प्रवीण असा नवीन अर्थ 'कुशल' या शब्दास प्राप्त झाला व हें अर्थान्तर लक्षणेमुळे घडून आलें. इतकेंच, की ही लक्षणा या ठिकाणीं मूळांत प्रयोजनवती असली तरी आज ती निरूढा आहे. लक्षणेने घडून येणारें अर्थपरिवर्तन आणखीहि कांही प्रकारांनी होत असतें. कित्येकदा लक्षणेमुळे मुख्यार्थबाध तर होतोच; पण मूळांत नसणारा कांहीसा वाईट अर्थहि त्या शब्दाच्या अंगीं लक्षणाशक्ति आणते व सरावाने तोच आपणांस नैसर्गिक वाटूं लागतो. 'चर्वितचर्वण', 'चर्पटपंजरी', 'चतुर्भुज', 'चंद्रूगवाळें', इत्यादि

शब्दांना लक्षणेमुळे प्राप्त झालेला हीनार्थ आज किती रूढ आहे तें मुद्दाम दाखविण्याची जरूरी नाही. तसेंच मूलत: हीनार्थाचा लेशहि नसलेलीं कांही विशेषनामें लक्षणेमुळे काळाच्या ओघांत अर्थदृष्ट्या कशीं पालटतात व त्यांतून कांहीसा उपरोधिक अर्थ कसा निघूं लागतो तें 'दुढ्ढाचार्य' किंवा 'चंडिका' यासारख्या उदाहरणांवरून स्पष्ट होईल. भाषेंतील कांही रूढ वाक्प्रचारांतहि हेंच दिसतें. 'गळ्यांत घोरपड बांधणें', 'चंचुप्रवेश होणें', किंवा 'चाकोरींतून जाणें' यांसारख्या शब्दप्रयोगांना मूळांत नसणारे असे हीनार्थ केवळ लक्षणेमुळे आले आहेत व तेच अधिक रूढ आहेत. एकूण, व्यवहारांत पदोपदीं अनुभवास येणारी शब्दाची लक्षणा-शक्ति हें अर्थपरिवर्तनाचें एक मोठेंच कारण होय.

## अर्थप्रक्रियेचीं आणखी कांही कारणें—

अर्थपरिवर्तनाचीं आणखीहि कांही कारणें आहेत. विशेषत: बदलत्या समाज–जीवनाचा अर्थपरिवर्तनाशीं फार निकटचा संबंध पोहोचतो. सामाजिक जीवनांत एखादें स्थित्यंतर झालें म्हणजे त्या समाजांत रूढ असणाऱ्या कांही शब्दांचे अर्थहि बदलतात. समाजांतील चालरीत बदलली कीं तद्द्योतक शब्दांचे संकेतहि बदलावे हें शब्दस्वभावास धरूनच आहे. इंग्रजी भाषेंतील pecuniary हा शब्द या प्रकाराचें उत्तम उदाहरण आहे. हा शब्द लॅटिन pecu ( तु. सं. पशु ) या शब्दापासून आलेला असून त्याचा मूळ अर्थ पशु किंवा गुरेंढोरें असा आहे. प्राचीन काळीं गुरेंढोरें हीच मानवाची धनदौलत असल्यामुळे हा शब्द मालमत्ता किंवा संपत्ति ह्या अर्थी वापरला जाणें बरोबर होतें. आज परिस्थिति बदलली असून मालमत्ता गुरा-ढोरांच्या रूपांत मोजली जात नसतांनाहि लॅटिनमधील pecu या शब्दापासून सिद्ध होणारे शब्द धन किंवा द्रव्य या अर्थीच रूढ आहेत. इंग्रजींतील 'फी' ( fee < O. E. feoh < Lat. pecu) ह्या शब्दाची कथाहि अशीच आहे. फ्रेंच भाषेंतील 'बूर्ज्वा' (bourgeois) या शब्दाचा मूळचा अर्थ वास्तविक एक सामान्य नागरिक. परंतु राजकारणांतील स्थित्यंतरामुळे आणि सामाजिक विषमतेविरुद्ध झालेल्या उठावणीमुळे आज या शब्दाला एक वेगळाच अर्थ प्राप्त झाला आहे. किंबहुना 'पेटी बूर्ज्वा' ही साम्यवाद्यांच्या तोंडीं असणारी एक सभ्य शिवी होऊन बसली आहे. या दृष्टीने 'चळवळ' या मराठी भाषेंतील शब्दाचा इतिहास पाहण्यासारखा आहे. आज उठावणी या अर्थी ( उदा. राजकीय किंवा सामाजिक चळवळ ) रूढ असणाऱ्या या शब्दाला शिवकालांत हा अर्थ प्राप्त झालेला नव्हता असें रामदासांनी त्याचा जो वापर केला आहे त्यावरून वाटतें. 'सामर्थ्य आहे चळवळीचें' ( दा. २०–४–२६ ) व 'अरे या आत्मयाची चळवळ पाहे' ( दा. १८-१-२२ ) हे दासबोधांतील या शब्दाचे दोन्ही वापर एकाच अर्थी म्हणजे शारीरिक हालचाल या अर्थी आहेत. परंतु चळवळ म्हणजे राजकीय चळवळ हा अर्थ आपल्या मनांत असा कांही बसून गेला आहे, कीं रामदासांच्या त्या प्रसिद्ध वचनाचा अर्थ बहुतेक सर्वजण राजकीय दृष्ट्याच लावतात. असो. कार्यकर्ता या शब्दाचा इतिहास कांही अंशीं असाच आहे. 'नव्हे कार्यकर्ता भुमीभार झालों। तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों' असें रामदास आपल्या 'करुणाष्टकांत' म्हणतात, तेव्हा त्यांच्या मनांत राजकीय किंवा धार्मिक कार्यकर्ता असा भाव मुळींच नसून 'भक्ति आचरणांत आणणारा भक्त' या साध्या अर्थाने ते 'कार्यकर्ता' हा शब्द वापरीत आहेत. बदलत्या कालमानानुसार या शब्दाचा अर्थहि बदलला हें आपण जाणतोंच. संस्कृतांतील अनुक्रमें 'चरु' आणि 'चमस्' या यज्ञविषयक संज्ञांवरून मराठींत आलेले 'चरवी' आणि 'चमचा' हे दोन शब्द अर्थदृष्ट्या कसे व कां

बदलले हेंहि आपणांस ठाऊकच आहे. कधी वैज्ञानिक प्रगति किंवा वाढतें संशोधन यांमुळेहि शब्दांचे पूर्वार्थ पालटतात. उदा० ग्रीकमधून इंग्रजींत आलेल्या 'ॲटम्' या शब्दाचा मूळचा अर्थ कायम असला तरी युद्धकालांतील शास्त्रीय शोधांमुळे हा शब्द एका वेगळ्याच अर्थी प्रचारांत येऊं पहात आहे. तात्पर्य, समाजजीवनांतलि स्थित्यंतरें त्या समाजाचें अर्थविज्ञानहि थोडें-फार बदलूं शकतात. तसेंच सनातन असा मानवी स्वभावहि कित्येकदा अर्थप्रक्रियेस पोषक ठरतो. उदा० अशुभ किंवा अनिष्ट प्रकारावर सौम्यतेचें पांघरूण घालण्याच्या मानवी स्वभावां-तून अर्थच्युति किंवा pejoration संभवतें. मृत्यूसारखी भयंकर गोष्ट दुसरी कोणती असेल? पण मनुष्याने 'देवाज्ञा होणें', 'देहावसान घडणें,' 'कालवश होणें,' 'जगाचा निरोप घेणें', 'बोला-वणें येणें', इत्यादि अनेक वाक्प्रचार रूढ करून मृत्यूचें स्वरूप थोडें सौम्य केलें आहे. हें करण्यांत त्या वाक्प्रचारांतील विशिष्ट शब्दांचा अर्थ च्युत झाला हें उघड आहे. अशुभतेप्रमाणेच बीभत्सताहि मनुष्याला मनापासून नको असते. पण प्रत्यक्ष व्यवहारांत तर ती भरपूर आहे. तेव्हा तडजोड म्हणून बीभत्स गोष्टींविषयी बोलतांना किंवा लिहितांना त्या शक्य तेवढ्या सभ्य व सुसंस्कृत शब्दांत व्यक्त करण्याची कला मनुष्य शिकला आहे. मलशुद्धीचा निर्देश 'शौचास' किंवा 'परसाकडे' 'या शब्दांनी करणें हें या मनोवृत्तीचें एक उदाहरण होय. मानवी मन पुरातन काळापासून एकसारखें कसें आहे हें तेराव्या शतकांतील 'लीळाचरित्रां'त याच अर्थी वापरांत असणाऱ्या 'अवकाशा बैसणें' या वाक्प्रचारावरून कळून येईल. वरील उदा-हरणांतून शौच, परस व अवकाश या शब्दांचे अर्थ च्युत झालेले स्पष्ट दिसतात. मनुष्यमात्रास प्रिय असणाऱ्या अतिशयोक्तीनेहि अर्थपरिवर्तनास हातभार लावलेला आहे. गजान्त लक्ष्मी, जमीनअस्मानाचें अंतर, क्षणाची उसंत, मुसळधार पाऊस, आसुरी भोजन, मरणप्राय दुःख, प्राणान्तिक वेदना, इत्यादि मराठींतील रूढ वाक्प्रचार पाहिल्यास अर्थप्रक्रिया आणि अतिशयोक्ति यांतील संबंध स्पष्ट होऊन अत्युक्ति ही शब्दाच्या मूलार्थास मारक कशी होते तें कळून येईल.

## शब्दसिद्धि आणि अर्थपरिवर्तन—

भाषेंतील शब्दसिद्धि आणि अर्थपरिवर्तन यांचाहि असाच निकटचा संबंध आहे. हें परिवर्तन Formative change म्हणून ओळखलें जातें. शब्दसिद्धि होतांना मूळ शब्दांस जे उपसर्ग वा प्रत्यय लागतात त्यांत या अर्थप्रक्रियेचें बीज असतें. उदा., 'रूं' हा प्रत्यय लागल्याने लेकरूं, गुरूं, वासरूं, पाखरूं, रांडरूं वगैरे शब्दांचे अर्थ कसकसे बदलले तें सहज ध्यानांत येईल. जी गोष्ट प्रत्ययाची तीच कांही अंशीं उपसर्गांची आहे. उप (उपनगर, उपनांव, उपचार, उपकरणें), आड (आडगांव, आडरान, आडखर्च, आडरस्ता), गैर (गैरमर्जी, गैरवर्तन, गैरसमज) इत्यादि उपसर्ग व तज्जन्य अर्थप्रक्रिया हा अभ्यासाचा एक स्वतंत्र विषय आहे. सामासिक शब्दघटनेमुळे जें अर्थपरिवर्तन घडून येतें त्याचें 'बहुव्रीहि' समास हें उत्तम उदाहरण होय. या प्रकारांत समासांतर्गत पदांच्या वाच्यार्थांच्या समाहाराशिवाय निराळाच असा अर्थ सामासिक पदाने दाखविला जातो व म्हणून या ठिकाणीं अर्थप्रक्रिया संभवते. ज्ञानेश्वर आपल्या अभंगांतून स्वतःची मुद्रिका 'बापरखुमादेवीवरु' अशी घालतात तेव्हा समाससिद्ध अर्थप्रक्रियाच घडते. एकंदरींतच सामासिक शब्दघटना ही अर्थपरिवर्तनास विशेष अनुकूल आहे असें चंबूगवाळें, चटकचांदणी, हातघाई, खोडाखोड, घावडाव, घरकोंबडा, चारचौघे, लंगोटीमित्र, नाकतोडा, पैसाफंड, नाकडोळे, कालवाकालव, मळमळ, इत्यादि विविध प्रकारचे

समास पाहून वाटतें. शब्दाची द्विरुक्ति किंवा अभ्यास हेंहि अर्थप्रक्रियेचें एक कारण असलें तरी सामासिक शब्दविचारांत तें समाविष्ट झालें असल्याने त्याचा पुन: निर्देश करण्याची जरूरी नाही.

लेखक व वाचक यांमधील विसंवाद—

अर्थप्रक्रिया आणखी एका कारणामुळे घडून घेण्याचा संभव असतो. तें कारण असें. कित्येकदा लेखकाने एखादा विशिष्ट शब्द कोणत्या अर्थाने वापरला आहे तें वाचकांना नीटपणें न कळल्याने लेखनाचा उकल तर बरोबर होत नाहीच, पण शिवाय त्या शब्दाचा निश्चित अर्थ काय याविषयी वाद माजूं लागतात. ॲरिस्टॉटलने शोकान्तिकेचें विवेचन करतांना 'कॅथार्सिस्' हा जो शब्द वापरला तो नेमका कोणत्या अर्थाने याविषयी टीकाकारांत अजूनहि वाद चालूं आहेत. तसेंच रामदास 'राजकारण' हा शब्द दासबोधांत चातुर्य या अर्थी वापरतात की राजकीय अर्थाने वापरतात हाहि एक वादविषय होऊन बसल्याचें वाचकांच्या स्मरणांत असेलच. रामदासांविषयी एका समकालिनाने केलेला उल्लेखहि असाच संदिग्ध स्वरूपाचा आहे. शिव–समर्थांची पहिली भेट केव्हा झाली–शके १५७१ त की शके १५९४ त–या प्रसिद्ध वादांत केशव गोसावी यांनी दिवाकर गोसाव्यांस शके १५९४ मध्ये लिहिलेल्या ज्या पत्राचा उल्लेख वारंवार केला जातो त्या पत्रांत केशवस्वामी लिहितात—" राजे यांची पहिलीच भेट आहे. वाडीचे लोक खटपटेस आणावे. झाडी बहुत आहे...इ." वरील पत्रांतील 'पहिलीच भेट' या शब्दांचा अर्थ नेमका कोणता या प्रश्नावर महाराष्ट्रांत वाद माजले आणि वादांतील दोन्ही पक्ष आपापल्या सोयीप्रमाणे या शब्दांचा अर्थ करूं लागले. शिव–समर्थांची भेट शके १५९४ पर्यंत झालेली नव्हती असें मानणाऱ्या पक्षास वरील पत्रांतील 'राजे यांची पहिलीच भेट आहे' या वाक्याने मोठाच आधार मिळाला व तें वाक्य त्यास निर्णायक स्वरूपाचें वाटलें. यावर 'ते इंसगमना पहिलीच आहे' या रघुनाथपंडितांच्या काव्यपंक्तीचा निर्वाळा देऊन विरोधी पक्षाने, म्हणजे शिवसमर्थांची भेट शके १५७१त झाली असें मानणाऱ्या पक्षाने, 'पहिलीच भेट' यांतील 'पहिलीच' हा शब्द वाच्यार्थाने न घेतां तो लाक्षणिक अर्थाने म्हणजे पूर्वीची, जुनी, मूळची या अर्थी घेतला पाहिजे असें उत्तर देऊन उपर्युक्त पत्राचें वादांतील निर्णायकत्व पार उडवून लावलें. शब्दप्रयोगांत संदिग्धपणा आल्याने अर्थसंभ्रम कसा होतो याचें आणखी एक उदाहरण ज्ञानेश्वरांच्या काव्यांत पहावयास मिळतें. ज्ञानेश्वरींत 'कानडें' हा शब्द कठिण, दुर्बोध, अवघड या अर्थी अनेकदा येतो हें आपणांस ठाऊक आहे ( ज्ञा. ६-१२०; ९-४२; ११-६८३; १२-३१; १८-५४२ ). आता, महाराष्ट्रियांस कन्नड भाषा समजण्यास दुर्बोध किंवा अवघड असल्यामुळे कन्नड या शब्दापासून ध्वनिप्रक्रियेच्या नियमाप्रमाणे सिद्ध होणारा 'कानड' हा शब्द मराठी भाषेंत विशेषण म्हणून वरील अर्थाने रूढ होणें संभवनीय आहे. हें सर्व ठीक झालें. परंतु ज्ञानेश्वर जेव्हा अभंगांत 'कानडा हा विठ्ठलु कर्नाटकु' असें म्हणतात तेव्हा मात्र अर्थसंभ्रम होण्याची शक्यता उत्पन्न होते. कारण वरील निर्देश नेमका कशाचा तें वाचकास कळत नाही. ज्ञानेश्वरींतील 'कानडें' हा शब्द त्याच्या परिचयाचा असल्यामुळे येथे ज्ञानेश्वर तेंच विशेषण विठ्ठलास लावून देवाचें दु:साध्यत्व सुचवीत आहेत असें वाटतें न वाटतें तोंच 'कर्णाटकु' या पुढील शब्दाकडे लक्ष जाऊन विठ्ठल हें जें वारकऱ्यांचें दैवत तें मूळचें कानडें म्हणजे कानडी किंवा कर्नाटकी होय असें तर ज्ञानेश्वरांना म्हणावयाचें नसेल ना अशी शंका मनांत येतें. वरील अभंगांत 'कानडा'

हें विशेषण 'कर्णाटकु' या शब्दास जोडून आल्यामुळे तें वाच्यार्थानें घ्यावयाचें की ज्ञानेश्वरींतील लाक्षणिक अर्थानें घ्यावयाचें अशा संभ्रमांत वाचक पडतो. पण हा घोटाळा येथेच संपत नाही. कारण त्यांतून पुढे वारकरी संप्रदाय, विठ्ठल हें त्याचें दैवत व पंढरी हें क्षेत्र हीं सर्वच मूळचीं कर्नाटकीय असावीं किंवा काय असा एक व्यापक प्रश्न निर्माण होतो. असो. शब्दयोजना निश्चितार्थानें झाली नाही म्हणजे या गोष्टीचा परिणाम ऐतिहासिक घटनांवरहि कसा होऊं शकतो याचें उदाहरण महिपतिकृत तुकाराम चरित्रांत मिळतें. संतचरित्रकार महिपतिबोवा यांनीं तुकारामांचा आयुष्यक्रम २१ वे वर्षापर्यंत देऊन तेथे " पूर्वार्ध संपलें येणें रीती " असें म्हटलें आहे. एवढ्यावरून कै. पांगारकर असा तर्क बांधतात, की ज्याअर्थी तुकारामांचें निधन शके १५७२ च्या आसपास झालें त्याअर्थी त्यांची हयात एकूण ४२ वर्षांची असावी आणि साहजिकच त्यांचा जन्मशक शके १५३० हा असावा. ही गोष्ट संभवनीय असली तरी पांगारकरांचा तो केवळ तर्क आहे हेंहि ध्यानांत ठेवलें पाहिजे. " पूर्वार्ध संपलें येणें रीतीं " हा तुकारामांविषयींचा महीपतिबोवांचा उल्लेख संदिग्ध स्वरूपाचा आहे. कारण 'पूर्वार्ध' हा शब्द त्यांनी मोठ्या कांटेकोरपणें वापरला आहे असें नाही. तुकारामांचा एकूण आयुष्यक्रम ४२ वर्षांचा कल्पून त्याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन सारखे विभाग त्यांनी काल्पिलेले नसून त्यांच्या चरित्राची प्रपंच आणि परमार्थ अशी साधी विभागणी त्यांनी केली आहे. म्हणूनच महिपतिबोवांचें हें बोलणें आपण शब्दशः न घेतां भावार्थानें घेतलें पाहिजे. तसेंच मुक्तेश्वरानें आपल्या भारतांत वारंवार योजिलेल्या ' लीलाविश्वंभर ' या पदानेहि अभ्यासकांना घोटाळ्यांत पाडल्याचें आपणांस ठाऊक आहे. या पदांतून सूचित होणारीं ' लीला ' व ' विश्वंभर ' हीं मुक्तेश्वराच्या मातापितरांचीं नांवें होत असें रूढ मत आहे. तें खोडून ' लीलाविश्वंभर ' या नांवानें कोणतीहि मानवी व्यक्ति सूचित होत नसून हें जोडनांव मुक्तेश्वराच्या उपास्यदैवताचें म्हणजे श्रीदत्तात्रेयाचें दर्शक होय असें समजून श्री. प्रियोळकर आपल्या या नवसिद्धान्तासाठी पुरावा गोळा करीत आहेत. खुद्द ' मुक्तेश्वर ' या नांवाबाबतहि आज वाद माजूं पहात आहे. मुक्तेश्वर हेंच या कवीचें मूळचें नांव होय ही परंपरागत समजूत खोडून ' मुद्गल ' हें त्याचें व्यक्तिनाम व मुक्तेश्वर हें त्यानें काव्यरचनेसाठी, विशेषतः महाभारतासाठी धारण केलेलें मुद्रा-नाम होय आणि तें त्यानें आपलें आराध्यदैवत जें मुक्तेश्वर त्यावरून घेतलें असें स्वमत श्री. प्रियोळकर मांडीत आहेत.

मुक्तेश्वर जो मी अवधूत । माझेनि नामें मुद्रांकित ।
कथा विस्तारीं भारत । महाराष्ट्रपदबंधीं ॥ ४४ ॥

ही आदिपर्वाच्या प्रथमाध्यायांतील त्याची ओवी श्री. प्रियोळकर यांना निर्णायक वाटते व त्यानुसार मुक्तेश्वर या पदाचें ते निर्वचन करतात. तात्पर्य, संदिग्ध अर्थानें केलेली शब्दयोजना मुक्तेश्वराच्या चरित्राबाबत वाद माजविण्यास कारणीभूत झाली आहे यांत शंका नाही. अशा प्रकारच्या संदिग्ध शब्दप्रयोगांमुळे अर्थप्रक्रिया प्रत्यक्ष घडून येत नसली तरी शब्दाचा मूळ अर्थ बदलून टाकण्याचें सामर्थ्य त्यांत बीजरूपानें अस्तित्वांत असतें व पुढे मागे परिस्थिति बदलल्यास तसें अर्थपरिवर्तन घडून येतें असें दिसून येईल. 'चळवळ' हा रामदासोक्त शब्द या दृष्टीनें अभ्यसनीय आहे. स्वतः दासांनी तो हालचाल ( physical movement ) या अर्थी वापरला. आज तो राजकीय किंवा सामाजिक अर्थानें वापरला जातो. म्हणजे आज या

१. मुक्तेश्वरकृत आदिपर्व, खण्ड १, प्रस्तावना, पृ. १० ते २०.

शब्दाला जो विशिष्ट अर्थ येऊन राहिला आहे तो 'सामर्थ्य आहे चळवळीचें' या दासबोधामधील शब्दप्रयोगांत बीजरूपाने होता व पुढे परिस्थितीचें खतपाणी मिळाल्यामुळे त्याने मूळ धरलें व त्यास आकार आला असें मानावें लागतें.

## अर्थप्रक्रिया व तिचें स्वरूप—

शब्दाच्या अर्थपारिवर्तनास परिस्थिति किती प्रकारांनी अनुकूल होऊं शकते याचें विवेचन येथवर केलें. ही परिस्थिति आणि प्रत्यक्ष घडून येणारी अर्थप्रक्रिया यांतील संबंध कार्यकारणात्मक आहे असें म्हणण्यास हरकत नाही. सुशार (Saussure) या सुप्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञाच्या मतें इतर कोणत्याहि भाषिक प्रक्रियेप्रमाणे अर्थप्रक्रियेचेहि दोन स्थूल विभाग पडतात. पैकी एकास Synchronic change अशी संज्ञा असून दुसऱ्यास तो Diachronic change असें म्हणतो. Synchronic (Syn= सह, एकत्र; chronos= काळ) प्रक्रियेस मराठींत सार्वकालीन प्रक्रिया असें म्हणतां येईल. या सदरांतील भाषिक प्रक्रिया जगांतील बहुतेक सर्व पुढारलेल्या भाषांतून सारखेपणाने आढळून येतात. मग ती भाषा कोणत्याहि देशांत किंवा कोणत्याहि काळांत बोलली जाणारी असो. उदाहरणार्थ, उच्चारप्रक्रियेपुरतें बोलावयाचें झाल्यास स्वरागम, स्वरभक्ति, वर्णव्यत्यास किंवा समवर्णलोप यांसारख्या कांही प्रक्रिया, थोड्याप्रमाणांत कां होईना, पण कोणत्याहि भाषेंत आढळतात. भाषिक प्रक्रियेचा हा प्रकार स्थलकालनिरपेक्ष असल्याने त्यास सार्वकालीन म्हटलें. याच्या उलट, Diachronic (dia = through; chronos = time) स्वरूपाची प्रक्रिया ही नेहमी स्थलकालनिरपेक्ष असते. ती सर्व भाषांतून आढळेलच असें नाही. उदाहरणार्थ, शौरसेनी व मागधी या दोन प्राकृत भाषांत दिसून येणारी श्, ष् व स् या व्यंजनांची प्रक्रिया किंवा मराठींत आढळणारी ऋ या संस्कृत स्वराची प्रक्रिया ही त्या त्या भाषेपुरती मर्यादित, म्हणजेच कालसापेक्ष आहे. सार्वकालीन आणि कालसापेक्ष हे भाषिक प्रक्रियेचे दोन स्थूल भेद अर्थविज्ञानाच्या क्षेत्रांतहि आढळून येतात. भाषेंतील शब्दांची ये-जा, काळाच्या ओघांत होणारी त्यांची उत्पत्ति आणि लय, किंवा शब्दांची अनेकार्थता यांसारख्या कांही अर्थविषयक घटना या कोणत्याहि भाषेंत नेहमी आढळत असल्यामुळे त्या सार्वकालीन स्वरूपाच्या होत असें म्हणणें भाग पडतें. अशा प्रकारची सार्वकालीन प्रक्रिया हा प्रत्येक भाषेचा एक स्थायीभावच होय असें म्हणण्यास हरकत नाही. तसेंच मनुष्याच्या कांही मूलभूत प्रवृत्ति व त्याचें कांही स्वभावविशेष सर्वत्र व सर्वकाळ सारखे असल्याने त्यामुळे घडून येणारी अर्थप्रक्रिया सर्व भाषांना समान असावी हेंहि स्वाभाविकच आहे. मृत्यूचें भयानक स्वरूप ज्यायोगें थोडें सौम्य होतें ती अर्थच्युति किंवा Pejoration या नांवाने ओळखली जाणारी प्रक्रिया जशी संस्कृतमध्ये किंवा मराठींत आढळते, तशी ती इंग्रजी, फ्रेंच, जर्मन इत्यादि युरोपीय भाषांतूनहि दिसते. याच्या उलट कोणत्याहि शब्दाच्या अर्थामध्ये जी सर्वांगीण वाढ होत जाते ती त्या त्या भाषेच्या स्वभाववैशिष्ट्यांस धरून होते, म्हणजेच ती कालसापेक्ष असते. व्यक्ति तितक्या प्रकृति हें जसें खरें, त्याप्रमाणें जितक्या भाषा तितके शब्दार्थ हेंहि खरेंच म्हटलें पाहिजे. त्या त्या भाषेंतील शब्द व त्या शब्दांनीं व्यक्त होणाऱ्या सूक्ष्म आणि विविध अशा अर्थच्छटा यांत त्या भाषेचें व्यक्तित्व प्रतिबिंबित झालेलें असतें. 'भाषांतरा'-वरील आपल्या निबंधांत यथार्थ भाषांतर ही एक अशक्य कोटींतील गोष्ट होय असें 'माला' कार म्हणतात तें उगीच नव्हे. कारण कोणताहि विचार एका भाषेंतून दुसरींत भाषांतरित होतांना त्या विचारांतील भाव जसाच्या तसा राहीलच असें नाही. इंग्रजी भाषेंतील 'माय गॉड' हा भीतिविस्मयोद्गार जसा मराठींत

यथार्थपणें अनुवादितां येणार नाही, तसेंच ' इश्श ' या खास मराठी शब्दांतील मुग्ध शृंगार दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत व्यक्त करणें अशक्यप्राय होईल. ' बूर्ज्वा ' या फ्रेंच भाषेंतील शब्दाचीं जीं रियत्यंतरें झालीं तीं जशीं खास युरोपीय वळणाचीं आहेत, तसें मराठींत ' मानभाव ' या शब्दाचा अर्थ जो क्रमाक्रमाने उतरत गेला तो प्रकार खास मराठी वळणाचा म्हटला पाहिजे. कालसापेक्ष अर्थप्रक्रियेच्या या उदाहरणांवरून या प्रक्रियेचें स्वरूप सार्वकालीन अर्थप्रक्रियेपेक्षा थोडें निराळें कसें आहे तें ध्यानांत येईल. अर्थपरिवर्तनाची ही स्थूल विभागणी विचारांत घेऊन मराठी भाषेंत अर्थप्रक्रियेचे जे कांही ठळक प्रकार आढळतात त्यांची नोंद येथून पुढे करूं. हा विषय फार व्यापक असल्यामुळे तपशिलांत न शिरतां त्याचें स्थूल दर्शन घडविणें एवढेंच येथे शक्य आहे.

## अर्थविस्तार आणि अर्थसंकोच—

अर्थपरिवर्तनाच्या सार्वकालीन प्रकारांत अर्थविस्तार हा प्रमुख होय. कारण ही प्रक्रिया सर्व भाषांतून आढळते. ब्राएल् याच्या मतें तर शब्दार्थाचा विकास ज्या तीन प्रमुख अंगांनी होत असतो त्यांपैकी अर्थविस्तार ही एक प्रमुख बाब असून बदलती ऐतिहासिक परिस्थिति ही अर्थविस्तारास कारणीभूत होत असते असें त्याचें म्हणणें आहे. पामरसारखे भाषाशास्त्रज्ञ तर यापुढे जाऊन म्हणतात, की अर्थप्रक्रियेचे सर्व लहानमोठे प्रकार ज्या दोन प्रमुख प्रक्रियां-मध्ये सामावतात त्या म्हणजे एक अर्थविस्तार व दुसरी अर्थसंकोच. पामरच्या विधानांतील अतिव्याप्ति वगळल्यास अर्थविस्तारास त्याने दिलेलें महत्त्व अवास्तव आहे असें म्हणतां येणार नाही. अर्थविस्ताराचा उगम कित्येकदा कांही ऐतिहासिक घटनांमध्ये असतो या ब्राएलच्या म्हणण्याचा पडताळा इंग्रजी भाषेंतील pecuniary यासारख्या मागे दिलेल्या उदाहरणांवरून मिळतो. मराठींतील ' व्यासपीठ ' किंवा ' पेशवाई ' यांसारख्या शब्दांतून दिसून येणारा अर्थविस्तार हाहि इतिहासमूलच आहे. अर्थविस्ताराची प्रक्रिया सामासिक शब्दांमध्ये विशेषत्वाने आढळते. दोन शब्द समासांत एकत्र येतात तेव्हा त्यांचा मिळून होणारा अर्थ हा त्या शब्दांच्या स्वतंत्र अर्थांहून कित्येकदा फार व्यापक असतो. वेणीफणी, काजळकुंकू, पीकपाणी, भाजीभाकर, झांकापाक, कपडालत्ता, इत्यादि सामासिक शब्दांतून झालेला अर्थविस्तार उघड आहे. कित्येकदा एखाद्या विशिष्ट कल्पनेचें सामान्यीकरण होऊन तिचा अर्थ पूर्वीपेक्षा अधिक व्यापक होतो. उदा. ' पंचपक्वान्नांच्या जेवणां 'त पक्वान्नें पांचच असतील असें नाही; वक्त्याचे ' दोन शब्द ' हि कंटाळवाणे होऊं शकतात; ' दीडदमडीची वस्तु ' कित्येकदा अमोल ठरते; आणि ' नऊ नवसांचा ' मुलगा कधी एकहि नवस केल्यावांचून लहानाचा मोठा होतो. वरील शब्दप्रयोगांचे अर्थ त्यांत व्यक्त झालेल्या विशिष्ट कल्पनांहून कितीतरी व्यापक झाले आहेत.

अर्थविस्ताराइतकेंच अर्थसंकोचालाहि महत्त्व आहे. शब्दाचा मूलार्थ जसा अधिक व्यापक होतो, तसाच तो संकुचितहि होऊं शकतो. संस्कृतांतील ' नेत्र ' (< नी = to lead, guide, conduct, direct ) व ' घृत ' (< घृ = to besprinkle, moisten ) यांसारख्या शब्दांत अर्थाचा संकोच झाला आहे. ' मातेच्या वेणा मातेस ठाऊक ' या म्हणींतील ' वेणा ' ( < सं. वेदना ) म्हणजे सर्वसामान्य अर्थाने वेदना नसून त्या प्रसूतिवेदना होत. तसेंच इंग्रजींतील Meat व Deer या शब्दांचे मूलार्थ अनुक्रमें खाद्य पदार्थ व वन्य पशु असे असतांना आज हे शब्द संकुचित अर्थाने वापरले जातात. हीं सर्व अर्थसंकोचाचीं उदाहरणें

होत. कांही विशिष्ट व्यवसाय करणाऱ्या व्यावसायिकांकडून या प्रक्रियेस विशेष हातभार लावला जातो. समाजांतील हे भिन्नभिन्न व्यावसायिक कांही शब्दांचा वापर नेहमी आपापल्या मर्यादित क्षेत्रांत संकुचित अर्थाने करीत असतात. नमुन्यादाखल म्हणून ' पंखा ' हा शब्द पहा. संस्कृत पक्ष या शब्दापासून साम्यतत्त्वाने सिद्ध होणारा हा शब्द निरनिराळ्या व्यवसायांत भिन्नभिन्न अर्थांनी वापरला जातो. घिसाड्याचा पंखा, पिंजाऱ्याचा पंखा, गवंड्याचा पंखा, पगडबंदाचा पंखा, हे सारे पंखेच असले तरी त्यांची स्वरूपे फार निरनिराळीं आहेत. हीं सर्व व्यावसायिक अर्थसंकोचाचीं उदाहरणें होत. नेमस्त ( < सं. नियमस्थ ) या शब्दाचा एक मवाळ राजकीय पक्ष या अर्थानें होणारा राजकारणक्षेत्रांतील वापरहि यांपैकीच म्हटला पाहिजे. सामासिक शब्दांमुळे जसा अर्थविस्तार होतो, तसाच अर्थसंकोचहि होऊं शकतो. उदा० पुण्यतिथि किंवा शतपावली या शब्दांचे मूळचे व्यापक अर्थ जाऊन आज त्यांचा झालेला अर्थसंकोच सर्वांना परिचित आहे.

## अर्थभ्रंश आणि अर्थप्रशस्ति—

कोणतीहि अर्थप्रक्रिया म्हटली, की तिच्यामध्ये शब्दाच्या मूलार्थाचा भ्रंश थोड्याफार प्रमाणांत होतच असतो हें खरें असलें तरी अर्थभ्रंश ( Deterioration of meaning ) हा अर्थप्रक्रियेचा एक स्वतंत्र प्रकार मानण्यांत येतो. या प्रक्रियेच्या मुळाशीं निरनिराळीं कारणें असूं शकतात. कधी ती अतिशयोक्तीमुळे घडून येते. डोक्यावर बसणें, घारेवर घरणें, ओठ पिळला तर दूध निघणें, फैलावर घेणें, नाकीं नऊ येणें, कांटा ढिला होणें, इत्यादि वाक्-प्रचारांत जो मूलार्थाचा भ्रंश झालेला दिसतो तो अतिशयोक्तीमुळे होय. बोलण्याचालण्यां-तील औपचारिकता हेंहि अर्थभ्रंशाचें एक कारण असूं शकेल. पत्रांचे निरनिराळे मायने, कुशल प्रश्न, किंवा आभारखेद-प्रदर्शनादि बोलण्याचे कांही ठराविक प्रकार यांतून अर्थभ्रंश पदोपदीं होत असतो. मी आपला आभारी आहें, सूज्ञांस अधिक लिहिणें नलगे, तसदीची माफी असावी, लोभ असावा ही विनंति, आपला नम्र, अलभ्य लाभ इत्यादि वाक्प्रचारां-तून आढळणारा औपचारिकपणा सर्वांच्या परिचयाचा आहे. शब्दार्थाचा मूळचा रंग उडून जाण्याची ही प्रक्रिया ( discoloration ) मराठीप्रमाणे इंग्रजी भाषेंतहि आहे. हें इंग्रजांच्या तोंडीं दिवसांतून छप्पनदा येणाऱ्या ' Sorry ' व ' Thank you ' या दोन अर्थशून्य शब्दप्रयोगांवरून कळून येईल. कधीकधी शब्दाच्या मूलार्थाशीं सर्वस्वीं विरुद्ध असा भ्रष्ट अर्थ चुकीने रूढ होऊन बसतो व तोच त्या शब्दाचा खरा अर्थ अशी समाज आपली समजूत करून घेतो. अपरोक्ष, अचपळ, अचोज, आजन्म, ग्यानबा ( < सं. ज्ञान ) इत्यादि मराठी शब्दांचे रूढ अर्थ हीं खरोखर विरुद्धार्थाचीं उदाहरणें होत. अर्थच्युतीचा विचार आपण मागे अर्थप्रक्रियेची कारणमीमांसा करतांना केलाच आहे. या प्रक्रियेच्या अगदी उलट अशी एक अर्थप्रक्रिया आढळते. तिचें नांव अर्थप्रशस्ति किंवा Melioration. शब्दाच्या मूलार्थामधील हीनत्व जेव्हा नष्ट होऊन जातें किंवा मुळांतच चांगला असणारा अर्थ जेव्हा अधिक चांगला होतो तेव्हा ही प्रक्रिया संभवते. फारशी किंवा कानडीसारख्या परकीय भाषांतून मराठींत आलेल्या शब्दांच्या बाबतींत ही प्रक्रिया विशेषत्वाने दिसते. अलड ( < क० अल्लड = दंगेखोर ) व गरीब ( < फा० घरीब् = दीन, लाचार ) हे मराठींत रूढ झालेले दोन शब्द या दृष्टीने अभ्यसनीय आहेत. अर्थप्रशस्ति कधी अतिशयोक्ती-मुळे होते, तर कधी प्रेमातिरेकामुळे होते. अनर्थ ( = पराकाष्ठा, कमाल ), अगत्य ( = आस्था,

< सं. अगति ), अजगर ( = स्थितप्रज्ञ ) हीं उदाहरणें अतिशयोक्तिजन्य अर्थप्रशस्तीचीं, तर कांही विशिष्ट संदर्भात शिंचा, गाढवाच्या लेका, लबाड, चावट, गुलाम, लुच्च्या, वगैरे उदाहरणें प्रेमजन्य अर्थप्रशस्तीचीं होत.

## अर्थभेद—

अर्थभेद हा प्रत्येक भाषेंत तिच्या जन्मापासून असतो हें खरें असलें तरी या प्रक्रियेस अर्थविज्ञानांत एक विशेष स्थान आहे हें मान्य करावें लागतें. विद्यमान भाषेंत दोन शब्द दोन निरनिराळ्या परंतु संबद्ध कल्पना जेव्हा व्यक्त करतात तेव्हा त्या शब्दांत अर्थभेद आहे असें समजण्यास हरकत नाही. ' लीला ' आणि ' लीळा ' हे दोन शब्द लळयोरभेदः या न्यायाने व अर्थदृष्ट्याहि साधारणपणें एकरूप खरे; परंतु लीला म्हणजे भगवंताची व लीळा म्हणजे महानुभावी चक्रधराची हा अर्थभेद जाणत्यांच्या मनांत येतोच. संस्कृतमधील हृदय या एकाच शब्दापासून हियें हा ज्ञानेश्वरकालीन व हिय्या हा वर्तमान-कालीन शब्द सिद्ध होतो ही गोष्ट खरी; पण एकमूल अशा या दोन शब्दांत अर्थभेद आहे हें पुन्हा स्पष्ट करण्याचें कारण नाही. महानुभावांच्या चरित्रग्रंथांतून ' आरोगण ' हा शब्द अनेकदा येतो. परंतु त्यांतहि संकेत असा, की सर्वज्ञ श्रीचक्रधरांचें भोजन म्हणजे आरोगण किंवा आरोगणा, व इतरेजनांचें तें जेवण; म्हणजे येथेहि अर्थभेद संभवला. आरोगण आणि जेवण या शब्दांतील हा अर्थभेद महानुभावेतर वाङ्मयांतून दिसत नाही हें ध्यानांत घेण्या-सारखें आहे. कित्येकदा वस्तुस्थितीमुळे दोन शब्दांत अर्थदृष्ट्या भेद निर्माण होतो. झोंपाळा-हिंदोळा, कांबळें-घोंगडी, लुगडें-पातळ, या शब्दांच्या जोड्या या दृष्टीने अभ्यसनीय आहेत. कधी व्यावहारिक सोयीसाठी दोन शब्दांत अर्थभेद मानावा लागतो. कांही वर्षांपूर्वी भाषा-शुद्धीची चळवळ चालू होती तेव्हा फ्लॉवर-पॉट् या इंग्रजी शब्दाला मराठी पर्याय म्हणून कोणीं फुलपात्र हा शब्द सुचविला. परंतु फुलपात्र म्हटल्याने पाणी पिण्याचें भांडें डोळ्या-समोर येत असल्याने त्याचें पुष्पपात्र करावें लागलें. म्हणजे फुलपात्र व पुष्पपात्र या दोन शब्दांतील अर्थभेद एक प्रकारच्या आवश्यकतेतून जन्मास आला. कित्येकदा भाषेंत कांही परकीय कल्पनांचा व तद्वाचक शब्दांचा प्रवेश झाल्यामुळे त्या अर्थी भाषेंत प्रथमपासून रूढ असणाऱ्या शब्दांच्या अर्थात हळूहळू फरक पडत जातो. घर-बंगला, पंतोजी-मास्तर, तळ-स्टँड, पाठशाळा-कॉलेज, वैद्य-डॉक्टर, खानावळ-हॉटेल, वगैरे एक जुना मराठी व दुसरा नवीन इंग्रजी अशा शब्दांच्या जोड्यांतील अर्थभेद स्पष्ट आहे.

## अर्थसार आणि अर्थसंक्षेप—

प्रत्येक भाषेंत अशा कांही शब्दसंहति किंवा शब्दसमूह असतात, की त्यांचा वापर नेहमी संघटित स्वरूपांत म्हणजे त्यांत समाविष्ट असणाऱ्या सर्व शब्दांसकट केला जातो. तसेंच या घटक शब्दांनी स्वतंत्रपणें व्यक्त होणाऱ्या अर्थाहून कितीतरी अधिक अर्थ त्या शब्दसंहतींत सामावलेला असतो. इंग्रजींत Strained phrases या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या या शब्दसमुच्चयांस मराठींत सारभूत शब्दसंहति असें म्हणतां येईल. कधी या संहतींच्या मागे कांही सामाजिक, ऐतिहासिक किंवा वाङ्मयीन पार्श्वभूमि असूं शकते. अना-गोंदीचा कारभार, अठराविस्वें दारिद्र्य, नरो वा कुंजरो वा, घटोत्कची माया, ग्यानबाची मेख,

औट घटकेचें राज्य, इत्यादि अविभाज्य शब्दसंहतींच्या मागे असणारा इतिहास सर्वांना ठाऊक आहे. आपल्या नित्याच्या बोलण्यांत येणारे कर्तासवरता पुरुष, केलीसवरलेली बाई, देवधर्म, शान्तं पापम्, अहोरूपम्, इत्यादि वाक्प्रचार म्हणजे अविभाज्य शब्दसंहतिच होत. वरील सर्व उदाहरणांतून मूळांत विस्तृत असणारा अर्थ सारूपाने सांगितलेला दिसेल. कित्येकदा हें साररूपाने सांगणें फारच संक्षिप्त होऊन बसतें व त्यांतून बाएल् ज्यांस Pregnant verbs असें म्हणतो त्या प्रकारचीं सबीज क्रियापदें संभवतात. उजाडणें ( = सूर्योदय होणें ), मावळणें ( = सूर्यास्त होणें ), पचणें ( = अन्नपचन होणें ), वाचणें ( = बहुश्रुत होणें ), लिहिणें ( = ग्रंथलेखन करणें ), पाहणें ( = व्यापक अनुभव घेणें ), इत्यादि मराठी क्रियापदांतील अर्थसंक्षेप सर्वांच्या परिचयाचा आहे. ही प्रक्रिया नामांच्या बाबतींतहि कधी घडून येते असें यात्रा (= प्रेतयात्रा ) किंवा वारी ( = पंढरीची वारी ) यांसारख्या शब्दांवरून दिसतें. हीच प्रक्रिया आणखी पुढे गेली म्हणजे या संक्षेपप्रवृत्तींतून सौ. ( सौभाग्यवती ), ढ ( गाढव किंवा मूढ ), ह. भ. प. ( हरिभाक्तिपरायण ), वे. शा. सं. ( वेदशास्त्रसंपन्न ), गं. भा. ( गंगा-भागीरथी ) 'ग' ची बाधा ( गर्वविकार ), टी. बी. ( ट्युबरक्युलर बॅसिलाय् ) यांसारखे अर्थशून्य शब्दसंक्षेप निर्माण होतात. संक्षेप करण्याच्या प्रवृत्तीने गांठलेली ही मर्यादा होय.

### मराठीच्या अर्थप्राक्रियेचें ऐतिहासिक अंग—

सार्वकालीन स्वरूपाच्या अर्थप्रक्रियांपैकी कांही ठळक प्रकार आपण येथवर पाहिले. याशिवाय खास मराठीची म्हणून कांही अर्थप्रक्रिया आहे व तिचें समग्र विवेचन जरी येथे शक्य नसलें तरी तिच्या ऐतिहासिक स्वरूपाचें थोडक्यांत दिग्दर्शन केल्यावांचून ही चर्चा अपुरी राहील. मराठी भाषेच्या इतिहांतील निरनिराळे कालखंड विचारांत घेतल्यास असें दिसून येईल, की कांही शब्द त्या त्या काळांत कांही विशिष्ट अर्थानें रूढ असून पुढे कालान्तराने त्यांच्या अर्थांत स्पष्टपणें फरक पडत गेला आहे. मराठीच्या अर्थविज्ञानाचें हें ऐतिहासिक अंग कांही उदाहरणांवरून अधिक स्पष्ट होईल. 'अवस्था' हा शब्द आज आपण त्या शब्दाच्या संस्कृतांतील मूलार्थाने वापरतों. परंतु प्राचीन मराठी वाङ्मयांतील या शब्दाचे पुढील उल्लेख पाहतां त्याचा वापर उदासीनता, तळमळ किंवा चुटपुट अशा संकुचित अर्थाने केलेला दिसतो. उदा०

> दिनु तैसी रजनी मज जाली गे माये ।
> अवस्था लावुनि गेला अझुनी कां न ये ॥ ( ज्ञानेश्वरांची गाथा )
> माझिये मातेसि तुझी अवस्था ( लीळा. उत्तरार्ध ४१९ )
> अवस्था लागतां चटपट । नामस्मरण करावें ( दासबोध ४.३.६ )

याशिवाय प्राचीन मराठी वाङ्मयांत हा शब्द अनेक ठिकाणीं विरहाकुल अवस्था या अर्थाने वापरलेला आठवतो ( उदा० उखाहरण पृ. २८; ऋद्धिपूरवर्णन २५८, उद्धवगीता १७२, स्मृतिस्थळ २; धवळे पूर्वार्ध ३१ व ६४ ). 'चळवळ' हा शब्द आज आपण राजकीय किंवा सामाजिक उठावणी या अर्थाने वापरीत असलों तरी रामदासांच्या काळांत तो हालचाल या साध्या अर्थाने वापरला जाई [ दासबोध १८-१-२२; २०-४-२६ ]. हीच गोष्ट 'निबन्ध' या शब्दाचीहि आहे. गंभीर स्वरूपाचें विचारप्रवर्तक गद्यलेखन हा या शब्दाचा आजचा अर्थ इंग्रजींतील Essay या शब्दाचा वाचक असून निबंधाचा यादवकालांतील अर्थ न्याय-विषयक आधार किंवा पुरावा असा असल्याचें महानुभावीय गद्य ग्रंथांवरून दिसून येतें (लीळा-

चरित्र एकांक; अधिकस्मृति १० ). भलें ( < सं भद्र ) या शब्दापासून सिद्ध होणारीं भलतैसें व भलतेधवा यांसारखीं क्रियाविशेषणें हीं यादवकालांत आज रूढ असणाऱ्या या शब्दांच्या अर्थाहून फार भिन्न अर्थानें वापरलीं जात असें दिसतें. भद्र या संस्कृत शब्दांतील शुभत्वाची कल्पना, तो शब्द मराठींत उतरतांना नाहीशी झाली व यादवकालांत भलें या शब्दापासून सिद्ध होणारीं क्रियाविशेषणें वाटेल तसें, किंवा कसेंहि या अर्थीं वापरांत आलीं. आज या शब्दाचा हाहि अर्थ लुप्त झाला असून भलतें या शब्दांत एक प्रकारचा हीनार्थ येऊन राहिला आहे. तसेंच कानडें व मऱ्हाटें हे शब्द ज्ञानेश्वरींत आजच्याहून निराळ्या अर्थानें, म्हणजे अनुक्रमें कठिण व सुलभ या अर्थीं येतात. अभंग या शब्दाची कथा कांही अंशीं अशीच आहे. विशिष्ट छन्दांत रचिलेलें एक भाक्तिकाव्य या अर्थानें आज रूढ असणारा हा शब्द प्राचीन काळांत ग्रंथाचें कर्तृत्व [ authorship ] या अर्थीं वापरला जाई असें 'या ग्रंथाचा अभंगु मज देयावा जी' या स्मृतिस्थळांतील उल्लेखावरून वाटतें ( स्मृ. ११३ ). तसेंच 'भीक्षा' या शब्दांचा अर्थ महानुभावीय वाङ्मयांत दीक्षा वा अनुग्रह किंवा उपदेश असा असून तो या शब्दाच्या आजच्या अर्थाहून उघडच निराळा आहे. मराठी भाषेंत शब्दांचे अर्थ काळाच्या ओघात कसे बदलत गेले हा अभ्यासाचा एक स्वतंत्र विषय असून वर त्याचें दिग्दर्शन मात्र केलें आहे.

## भाषेंतील शब्दांची ये – जा—

प्रत्येक भाषेंत शब्दांची ये – जा एकसारखी चालू असते. किंबहुना जुनेपाने शब्द काळाच्या ओघांत नाहींसे होऊन त्यांच्या जागीं नवकल्पनावाचक नवीन शब्द येणें हें भाषेच्या जिवंतपणाचें लक्षणच म्हटलें पाहिजे. भाषेंतील शब्दसंग्रहाचें हें सतत चालू असणारें स्थित्यंतर कांही अंशीं परिस्थितिजन्य मानावें लागतें. कारण शब्द हे कल्पनांचे द्योतक असतात व परिस्थितीबरोबर त्या कल्पना पालटल्या म्हणजे तद्वाचक शब्दांचेंहि मग कांही कारण उरत नाही. आपल्या पूर्वकालीन संस्कृतींत यज्ञसंस्थेस विशेष महत्व असल्यामुळे तत्संबद्ध असे अनेक शब्द तत्कालीन भाषेंत निर्माण झाले. आज यज्ञसंस्थाच नामशेष झाल्यामुळे वेदी, पुरोडाश, दर्वी इत्यादि यज्ञविषयक संज्ञाहि लुप्तप्राय व्हाव्या यांत आश्चर्य नाही. तसेंच समाजाची जीवनश्रद्धा फार झपाट्याने बदलत असल्यामुळे वैश्वदेव, अहिताग्नि, अग्नेहोत्र, श्रावणी, एकादष्णी, आवर्तन, लघुरुद्र, महारुद्र इत्यादि मागील पिढीपर्यंत सर्वांना परिचित असणाऱ्या शब्दांना आपण लौकरच मुकणार आहों. आज आमच्या घरीं 'म्हणणें' आहे, हें वाक्य यापुढे किती जणांना कळेल याची शंकाच वाटते. मौंजीबंधन, पळसुला, देवक, भिक्षावळ, हेहि शब्द इतिहासजमा होण्याच्या मार्गावर आहेत. नोंदणीपद्धतीच्या या युगांत हळदी, वाङ्निश्चय, सीमांतपूजन, तेलफाळ, रुखवत, मूळ, सप्तपदी, नक्षत्रदर्शन, मांडवपरतणें वगैरे शब्द प्रत्यक्ष वधुवरांनाहि अर्थशून्य वाटतील. ज्ञानेश्वरांच्या काळीं सोन्याचा भाव साडेपंधरा रुपयांस तोळा असल्यामुळे ज्ञानेश्वरींत 'साडेपंधरें' हा शब्द सोनें या अर्थानें सर्रास वापरला गेला. पुढे सोन्याचा हा भावहि गेला आणि त्याबरोबर तो शब्दहि गेला. वरील शब्दांचा विनाश जसा बदलत्या परिस्थितीमुळे घडून आला, तसेंच भाषेंतील उच्चारप्रक्रियेमुळेहि कांही शब्द लोप पावलेले आढळतील. अर्थात् अशा शब्दांचें स्वरूप, एखादुसरा अपवाद वगळल्यास, प्रत्ययात्मक असणार हें उघड आहे. हे प्रत्यय अतिवापराने झिजून झिजून शेषमात्र उरतात व त्यामुळे अर्थाभिव्यक्तीचें काम त्यांच्याकडून व्हावें तसें होत नसल्याने

त्यांच्या जागीं नवीन प्रत्यय येतात. भाषेच्या प्रत्ययप्रक्रियेचें मूळ उच्चारप्रक्रियेंत आढळतें तें याच कारणामुळे. यादवपूर्वकालापासून होत आलेलें मराठी भाषेचें विकसन पाहिल्यास ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल. अकारान्त पुल्लिंगी नामाच्या प्रथमेचे एकवचनी ' उ ' व ' ओ ' व तसेंच तृतीयेचे एकवचनी ' एं, ', ' एन ' आणि ' आं ' व अनेकवचनी ' ई ' हे जुने प्रत्यय वर्तमान मराठी बोलींतून नाहीसे झाले आहेत. तसेंच वेन्हीं, सवें, करून, लागी, कारणें, प्रति, दोषें, तवं, पासाव, भीतरीं, माझारी यांसारखीं शब्दयोगी अव्ययेंहि नष्टप्रायच आहेत असें म्हटल्यास चालेल. सार्वनामिक विशेषणांपैकी एसण–जेसण–केसण–तेसण हीं वर्तमान मराठींत नाहीत. ' आणिक ' हें सर्वनाम अजून शिल्लक असलें तरी त्याचा यादवकाळांतील अन्य, निराळें किंवा दुसरें हा अर्थ लुप्त होण्याच्या मार्गावर आहे. येर, अनारिस , इखित, आनान यासारखीं सार्वनामिक विशेषणें तर केव्हाच लोप पावलीं. ' आउट ' हें संख्यावाचक औटकीच्या पाढ्यांत तेवढें राहिलें; इतरत्र त्याची जागा ' साडेतीन ' या सामासिक पदाने घेतली. दीजे, घेईजे यांसारख्या कर्मणि रूपांतील ' ज ' केव्हाच मागे पडला. गुज ( ∠ सं. गुह्य ), काज ( ∠ सं. कार्य ), खाजें ( ∠ सं. खाद्य ) यांसारख्या शब्दांतून तो आढळत असला तरी त्याचें स्वरूप पार पालटून गेलें आहे. कारण आता हीं भविष्यकृदन्तें उरलेलीं नसून तीं नामें झालीं आहेत. अव्ययांची यादी विचारांत घेतां शब्दलोप फारच मोठ्या प्रमाणावर झालेला दिसतो. पैं, पां, कीर किंवा हान यांसारखीं पादपूरकें, अगा, बापु, कटकटा हीं उद्गारवाचकें, नावेकवेन्हीं, जे, मां, यांसारखीं उभयान्वयी, व निन्हां, विपायें, भलतैसें, भलतेधवां, अळुमाळ, नांवानांवा, आहाच, यांसारखीं क्रियाविशेषणें लुप्त झाल्याला तीनचारशें वर्षे होऊन गेलीं. ' झणी ' हें एक जुनें अव्यय शिल्लक आहे, परंतु यादवकाळांतील त्याच्या नकारार्थी उपयोगाचा मागमूसहि आज दिसत नाही. याशिवाय कांही प्राचीन शब्द काळाच्या ओघांत लुप्त झालेले दिसतात ते कां या प्रश्नाचें उत्तर देणें अवघड आहे. भांगार, गदारोळ, गवांदी, मांदी, कैवाड, यांसारखे ज्ञानेश्वरींत नित्य आढळणारे शेंकडो शब्द वापरांतून कां गेले तें समजत नाही.

मात्र भाषेंतील शब्दसंग्रहास गळती लागलेली असली तरी त्यामुळे भाषेच्या शब्द-संपदेंत कांही उणीव उत्पन्न होते असें नाही. कारण काळाच्या ओघांत जसे जुने शब्द जातात तसे नवीन शब्द भाषेंत येतात. दिवसेंदिवस प्रगत होणाऱ्या मानवी संस्कृतीच्या संग्रहीं नवीन नवीन कल्पनांची मोठीच टांकसाळ असून तिच्यांतून नवेनवे शब्द प्रत्यहीं बाहेर पडत असतात. मानवी समाजाच्या वाढत्या गरजा या नवनिर्मित शब्दांनी भागवल्या जातात. दोन संस्कृतींचा मिलाफ किंवा एकाच संस्कृतीमधील परस्परविरुद्ध मतांचा संघर्ष यांतून नवीन कल्पनांची अतएव शब्दांची निर्मिती कशी होते हें पहाण्यासारखें आहे. इंग्रजांच्या साहचर्याने टेबल, रेल्वे, पोस्ट, कोट, बूट, मार्केट, स्टेशन, बस, रेडिओ, फोनो, सिनेमा इ. शब्द मराठी भाषेंत आपल्या डोळ्यांदेखत आले. तसेंच भारताच्या शतकभर चाललेल्या स्वातंत्र्ययुद्धाने जहाल–मवाळ, फेर–नाफेर, असहकारिता, सत्याग्रह, निरोधन, अशा अनेक शब्दांचें लेण मराठी भाषेस दिलें. सामाजिक चळवळींतून मंदिरप्रवेश, सहभोजन, नोंदणीविवाह, झुणकाभाकर, भूदानयज्ञ, भांडवलशाही, संप, साम्यवाद, वर्गविग्रह इत्यादि शब्दांची देणगी मराठीला दिली. नवसाहित्याने एकांकिका, नाट्यछटा, गद्यकाव्य, सुनीत, विलापिका, कणिका, क्षणिका यांसारखे नवीन लेखनप्रकार व तद्वाचक शब्द पुरविले. शास्त्रीय संशोधनहि या कामांत मागे नाही असें क्ष-किरण, नभोवाणी, ध्वनिलेखन, छायाचित्र, इ.

मराठी भाषेतील नवीन शास्त्रीय संज्ञांवरून दिसून येईल. इंग्रजींत Popular Etymology या नांवाने प्रसिद्ध असणाऱ्या एका अर्थप्रक्रियेचा उल्लेख याच ठिकाणीं केल्यास चालेल. कित्येकदा कांहीं परकीय शब्दांचीं अशुद्ध व विकृत रूपें समाजांत अज्ञानाने रूढ होतात; इतकेंच नव्हे तर, त्या अशुद्ध रूपांवर स्वभाषेचा नकली वेष चढविला जातो व त्यामुळे मूळांत परकीय असणारे हे शब्द स्वदेशी म्हणून राजरोस वावरतांना आढळतात. इस्टुरफांकडा [ Stuart Elphinstone ], रंगरूट. [ Recruit ], वलंदेज [ Hollander ], गणेशटेबल [ Constable ], आलबेल [ All Well ], किंवा कुंपणी सरकार [ Company Govt. ] हीं या प्रक्रियेचीं उदाहरणें होत.

### अर्थविज्ञानाचें स्थलकालसापेक्षत्व—

आधुनिक भाषाशास्त्र भाषेचा विचार स्थलकालसापेक्ष करतें. कोणतीहि भाषा जशी काळाच्या ओघांत बदलत जाते, तसेंच तिचें स्वरूप स्थलमानानुसारहि पालटतें. भाषाशास्त्रांतील या विचारास स्थलकालसापेक्षत्व ( Space-time context ) असें म्हणतात. आर्यभारतीय भाषांतून एक उदाहरण घेऊं, म्हणजे ही कल्पना अधिक स्पष्ट होईल.

सं. चक्र > पा. चक्क > प्रा. चक्क > अप. चक्क.
> नेपाळी ( १ ) चाक : ( = नितंब )[1]
( २ ) चाको : ( = वर्तुलाकार वस्तु; मधाचें पोळें )
( ३ ) चाक्लो : ( = दाट, निबिड )
> पश्चिम पहाडी भाषा : चक्की : ( = पिठाची गिरणी )
> कुमाओनी : ( १ ) चाक : ( = केळ्यांचा घड )
( २ ) चाको : ( = हाताने चालविण्याची चक्की )
> बंगाली : ( १ ) चाक : ( = चाक किंवा मधाचें पोळें )
( २ ) चाक्ला : ( = वर्तुलाकार )
> आसामी : साका : ( = कुंभाराचें चाक )
> ओरिया : ( १ ) चाक : ( = गाडीचें चाक )
( २ ) चकुली : ( = एक खाद्यपदार्थ )
> बिहारी : चकी : ( = एक वर्तुलाकार मिठाईचा प्रकार )
> सिन्धी : ( १ ) चकु–को : ( = घट्ट दुधाचा गोळा )
( २ ) चकरी : ( = पाण्याचें चाक )
> गुजराथी : ( १ ) चाकु : ( = जाड, वर्तुलाकार )
( २ ) चाक्लो : ( = पाण्याचें चाक );
> हिन्दी : चाकल : ( = वर्तुलाकार, सपाट व रुन्द )
> लहाण्डी : चक्कुल : ( = विहिरीचें चाक )
> मराठी : चकली : ( = एक तिखट खाद्यपदार्थ )

वर संस्कृत 'चक्र' या शब्दाचीं दोन प्रकारचीं स्थित्यंतरें दिलीं आहेत. आडव्या ओळींतील संस्कृत–पाली–प्राकृत–अपभ्रंश या क्रमाने होणारें स्थित्यंतर कालसापेक्ष किंवा

---

१. टर्नर: नेपाळी शब्दकोश, पृ. १७१.

कालिक स्वरूपाचें आहे. उभीं एकाखाली एक याप्रमाणे दिलेलीं बंगाली, सिंधी, मराठी इत्यादि आधुनिक भाषांतील स्थित्यंतरें स्थलसापेक्ष किंवा स्थलिक स्वरूपाचीं होत. पैकी शब्दाची कालिक प्रक्रिया ऐतिहासिक म्हटली, तर स्थलिक प्रक्रिया वैस्तारिक म्हणावी लागेल. याप्रमाणे भाषेचा अभ्यास या दोन्ही अंगांनी केला तरच स्थळकाळांच्या आडव्या उभ्या धाग्यांनी विणलेल्या वाक्पटाची संपूर्ण कल्पना येऊं शकेल असें आधुनिक भाषाविज्ञानाचें म्हणणें आहे. मराठीपुरतें बोलावयाचें झाल्यास कोणतेंहि शब्दरूप उगमकाल, यादवकाल, मध्यकाल, शिवकाल, पेशवेकाल व वर्तमानकाल या क्रमाने कसें उत्क्रांत होत गेलें याची ऐतिहासिक दृष्टीने पाहणी करणें हा त्या शब्दरूपाचा कालसापेक्ष विचार झाला. याबरोबरच खानदेशी, वऱ्हाडी, अहिराणी, कोंकणी, डांगी इत्यादि मराठीच्या ज्या विविध प्रांतिक बोली त्यांतून तें शब्दरूप कसें पालटत गेलें हें पाहणें म्हणजे भाषेचा स्थलसापेक्ष विचार होय. हे दोन्ही विचार एकवटल्यावांचून भाषेच्या अभ्यासास पूर्णता येत नाही. हें म्हणणें जसें सर्वसामान्य भाषाविज्ञानास, तसेंच प्रस्तुत अर्थविज्ञानासहि लागू आहे. कारण शब्दाचा अर्थ जसा काळाच्या ओघांत पालटतो, तसाच तो स्थलविस्ताराबरोबरहि थोडाफार बदलण्याची शक्यता असते. उदा. मराठी ‘ मेर ’ ( < सं. मर्या = सीमा; मर्यादा ) हा शब्द पहा. ज्ञानेश्वरींत तो सीमा या अर्थाने आढळतो वर्तमान मराठींत डोंगराची कड किंवा काठ या अर्थी तो रूढ आहे. कोंकणींत व गोव्याच्या बोलींत त्याचा अर्थ शेताची हद्द असा होतो. वऱ्हाडींत पेरा किंवा लागण या अर्थी तो वापरतात. हेटकऱ्यांच्या बोलींत मेर म्हणजे शेतांतून घातलेले मातीचे बांध. ठाणें जिल्ह्यांतील बदलापूरच्या बोलींत ‘ मेरी करणें ’ असा वाक्प्रचार रूढ असून त्याचा अर्थ शेताच्या बांधावरील गवत कापून तो भाग नीट करणें असा होतो. कुडाळी बोलींत ‘ मेरधार ’ असा जोड शब्द असून त्याचा अर्थ शेताचे कुणगे करण्यासाठी रचलेली चिखलाची बांधोली असा आहे. गोव्याच्या बोलींत शेताच्या बाजूबाजूने जें पावट्यासारखें द्विदल धान्य पेरतात त्याला ‘ मेरेली ’ असा शब्द आहे. तात्पर्य, भाषेत असे कांही शब्द असतात, की ज्यांचे अर्थ स्थल व काल अशा उभय अंगांनी थोडेफार बदलतात. म्हणून अर्थविज्ञानाची इमारत या दोन पायांवर उभी करणें क्रमप्राप्त होतें. यांपैकी जो पाया कच्चा असेल त्या अंगाने ती खचणार असें समजावें.

( संपूर्ण )

---

## चतुर्मात्रिक आवर्तनी वृत्तें अथवा समुद्रावर्तनी वृत्तें वि. ज. सहस्रबुद्धे

डॉ. माधवराव पटवर्धन यांनी छन्दोरचनेंत सर्वच पद्यप्रकारांना निरनिराळ्या आवर्तनाच्या कोष्टकांत बसवून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तो आवर्तनसिद्धान्त जातिस्वरूप (मात्रासंख्याक) पद्यप्रकारांतील बहुतेक पद्यांना आणि जातिरचनेंत पर्यवसान पावणाऱ्या कांही थोड्या अक्षरगणवृत्तांनाच वस्तुतः योग्य रीतीने लागू पडत असल्यामुळे वादग्रस्तच आहे. तो विषय वादाचा म्हणून सोडून दिला तरी खुद्द माधवरावांच्याच विचारसरणीप्रमाणें पाहिलें असतां आवर्तनाचे पद्मावर्तनी वगैरे जे प्रकार संभवतात ते सर्व प्रकारहि त्यांनी दाखविलेच नाहीत. त्यांतहि थोडा अपुरेपणा अथवा धरसोड दिसून येत असल्यामुळे त्यासंबंधीं थोडें विवेचन प्रस्तुत लेखांत करणार आहे.

आवर्तन प्रकारांचा उल्लेख करतांना माधवराव म्हणतात की, "छन्द म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय. ही अक्षरशः पहातां अष्टमात्रिक, सप्तमात्रिक, षण्मात्रिक, पंचमात्रिक आणि चतुर्मात्रिक अशा आवर्तनाची असते". (छन्दोरचना, पान ९) परंतु यांपैकी चतुर्मात्रिक आवर्तनी वृत्तें व जाति यांचा स्वतंत्र विचार माधवराव यांनी केलाच नाही. तो विचार त्यांनी कां सोडून द्यावा हें नीटपणें कळत नाही. माधवराव यांच्या वतीने या प्रश्नास एक उत्तर मिळण्याचा संभव आहे तें उत्तर मीच येथे दाखवून देतों. दुसऱ्या एके ठिकाणीं माधवराव म्हणतात की,

"चतुर्मात्रिक आवर्तनांचीं वृत्तें असूंच शकत नाहीत असें नाही; परंतु चतुर्मात्रिक आवर्तनाचीं वृत्तें सारींच अष्टमात्रिक आवर्तनांत बसतात. उलटपक्षीं अष्टमात्रिक आवर्तनाचें वृत्त चतुर्मात्रिक आवर्तनांत बसेलच असें नाही. उदाहरणार्थ (⏑– – —) (—⏑—⏑—) या अष्टमात्रिक गणाचे चार चार मात्रांचे दोन दोन तुकडे पडूं शकत नाहीत. यासाठी चतुर्मात्रिक आवर्तनाच्या वृत्तांचा समावेश पद्मावर्तनी वृत्तांत करणेंच सोयीचें आहे." (छन्दोरचना पान ९६).

असें हें उत्तर येऊं शकेल. परंतु हें उत्तर फारसें सयुक्तिक नाही. कारण हेंच उत्तर पंचमात्रिक आवर्तनी वृत्तांनाहि लागू पडणारें आहे. पंचमात्रिक आवर्तनांचा समावेश दशमात्रिक आवर्तनांत करणेंच सोयीचें होतें व आहे; आणि त्यासाठी पंचमात्रिक आवर्तन प्रकार अजीबात गाळून दशमात्रिक आवर्तन प्रकारच दाखविणें अधिक इष्ट झालें असतें. आवर्तनांचा तालाशीं संबंध आहे असें माधवराव कित्येक वेळां मानतात; परंतु त्याबाबतींत निश्चित असें त्यांचें मत दिसून येत नाही. तालतत्त्वाविषयी प्रा. वि. म. कुलकर्णी यांचें मत येथे देणें उपयुक्त होणार आहे. ते म्हणतात की,

"जातींच्या चरणाचे भाग पाडतांना, गण पाडतांना, तालाचें महत्त्व लक्षांत घेतलें जाते. पद्य किंवा भृंग म्हणजेच आठ किंवा सहा गण मात्रांचे पाडण्यांत तालाचें मूळ तत्त्व आहे हें आपणांस समजतें" (वृत्तें व अलंकार पान १८) उदाहरण देऊन दुसऱ्या एके ठिकाणीं ते म्हणतात की, "गद्यांत जें आपण सरळ रीतीने सांगतों, तेंच पद्यामध्ये नियमांच्या चौकटींत बसवून सांगावें लागतें. नियम मोडून लिहिलें तर गातां येत नाही, तालावर म्हणतां येत नाही. उदाहरणार्थ 'मराठी असे आमची मायबोली' ही रचना पहा. कांही नियम सांभाळून ती रचना केली आहे. हेच शब्द बदलले तर ते तालावर म्हणतां येत नाहीत." (वृत्तें व अलंकार पान २)

अनुक्रमणिका

या दृष्टीने तालाचा व आवर्तनाचा संबंध लक्षांत घेतला तर मग असाहि आक्षेप घेतां येईल की, पंचमात्रिक आवर्तनाचा तालच आढळांत नाही. चतुर्मात्रिक तालाचा प्रकार शास्त्रकार मानतात (पहा—महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग १९ पान ६८।६९) म्हणून पंचमात्रिक आवर्तन प्रकार मानण्याची मुळींच गरज नव्हती. अर्थात् चतुर्मात्रिक आवर्तनें, अष्टमात्रिक आवर्तनांत बसतात एवढ्याच कारणासाठी चतुर्मात्रिक आवर्तनी वृत्तें व जाति यांचा स्वतंत्र विचार करण्याचें सोडून दिलें आहे हें योग्यच झालें असें कोणास म्हणतां येणार नाही.

चतुर्मात्रिक आवर्तनी पद्यासंबंधीं स्वतंत्र विचार माधवराव यांनी अगदीच केला नाही, असेंहि नाही. गज्जलांजलीच्या प्रस्तावनेंत माधवराव म्हणतात की,

"अक्षरशः पहातां हीं वृत्तें (म्हणजे गज्जल) अष्टमात्रिक, सप्तमात्रिक षण्मात्रिक, पंचमात्रिक व चतुर्मात्रिक अशा आवर्तनांचीं असतात." "गज्जल हा अक्षरशः तालबद्ध असल्यामुळे त्यांत स्वरविस्ताराला वाव चिजेइतका मिळूं शकत नाहीं" याप्रमाणे माधवराव यांनी म्हटलें असून पुढे गज्जलांजलींतील एकंदर १०८ गज्जलांची आवर्तनाच्या दृष्टीने वर्गवारी दाखविली आहे. ती अशी--"अष्टमात्रिक गज्जल अनुक्रमांक १ ते ६, सप्तमात्रिक गज्जल ७ ते ५१, षण्मात्रिक ५२ ते १०० पंचमात्रिक १०१ ते १०७ आणि चतुर्मात्रिक गज्जल क्रमांक १०८"

ह्या वर्गवारींत चतुर्मात्रिक आवर्तनाचा एकच गज्जल स्वतंत्र असला तरी ही गोष्ट तात्त्विक दृष्टीने फार महत्त्वाची समजली पाहिजे. हा चतुर्मात्रिक गज्जल कोणता, तें कळण्यासाठी त्याचा एक चरण (आवर्तन विभाग पाडून) या खाली देत आहें.

तुजवी । ण सखे । मज को । णि नसे ।

यावर आक्षेपच घ्यावयाचा झाला तर हा गज्जल अष्टमात्रिक आवर्तनांत समाविष्ट करितां आला असतां असें म्हणतां येईल. परंतु माधवराव यांनी तसें केलें नाही हें अगदी उघड आहे.

गज्जलासंबंधीं प्राध्यापक रा. श्री. जोग यांचें मत माधवराव यांच्या मताशीं जुळणारेंच आहे. जोग म्हणतात की, "आवर्तनी वृत्तें तालबद्ध असल्याने अधिक गेय असतात. तसे गज्जलहि असतात. त्यांच्या गेयतेमुळे ते मराठींत विशेष लोकप्रिय झाले. गज्जलांत अष्टमात्रिक, सप्तमात्रिक, षण्मात्रिक पंचमात्रिक व चतुर्मात्रिक आवर्तनें असल्याने त्यांच्या गेयतेमध्ये विविधताहि आली आहे" (अभिनव काव्यप्रकाश पान ३३५) चतुर्मात्रिक आवर्तनें असलेले गजल कोणते, याचा खुलासा समजून घेण्यासाठी मी दोघातिघा लेखकांकडे पत्रव्यवहार केला त्यांत एका लेखकाने खालील गज्जल चतुर्मात्रिक आवर्तनी म्हणून कळविले आहेत.

१ आहेस तूं जगीं हें खोटें खरें न ठावें.
नाथा तथापि दूतें मी वाहतें स्वभावें
२ जमल्यास आज तारा अथवा खुशाल मारा
तुमच्याशिवाय थारा मजला कुठे उदारा
३ गोरी सलील सुंदर तूं भेटतां कुमारी
वाटे भवीं अजूनिहि आहे जरा खुमारी

सदर लेखक आणखी असेंहि कळवितात की, "गज्जल हे आपल्या जुन्या कल्पनांप्रमाणे मात्रावृत्तें नसून प्रत्येक स्थानीय अक्षराचें लघुगुरुत्व निश्चित असल्याने अक्षरगणवृत्तेंच होतील हें लक्षांत ठेवणें आवश्यक आहे."

सदर ओळी भृंगावर्तनी प्रकारांत बसूं शकतील म्हणून मी सदर लेखकास प्रश्न विचारला होता. त्याबद्दल त्यांचें उत्तर आलें आहे तें विचाराई आहे म्हणून येथे देत आहें.

" वरील ओळी भृंगावर्तनी प्रकारांत बसतील असें तुम्ही म्हणतां परंतु या प्रत्येक ओळींत व चरणांत मात्रा ६ व ७ या एकाच अक्षरांत येतात व त्या तोडून म्हणणें शक्य होत नाही. ६।६ मात्रांचे असे त्यांचे तुकडे होऊं शकत नाहीत. आता ८।८।४ असें वरील ओळींचें पृथक्करण करणें शक्य आहे. परंतु तिसऱ्या आवर्तनांत अदृश्य अशा चार मात्रांची भर घालावी लागते. संगीतांत तसें पाहिजे तर करावें. पद्यचर्चेत दृश्य मात्रांचाच विचार करावा असें माझें मत आहे म्हणून ४।४।४।४।४ अशीं आवर्तनें मी मानतों. "

असा खुलासा सदर लेखकांनी मजकडे केला आहे.

असो. याप्रमाणे विचार केला असतां चतुर्मात्रिक आवर्तनी वृत्तें स्वतंत्रपणें देण्यास हरकत नाही असें दिसून येईल. आता प्रत्यक्ष अशीं वृत्तें कोणतीं ठरतील यासंबंधीं अधिक स्पष्टता करणें क्रमप्राप्त व आवश्यक आहे म्हणून मी तिकडे वळतों.

प्राचीन मात्रावृत्तांपैकी आर्या किंवा गीति यांचें जें लक्षण पूर्वाचार्यांनी दिलें आहे तें चतुर्मात्रिक गणांनींच दिलेलें आहे. तेव्हा त्यांचा समावेश चतुर्मात्रिक आवर्तनी मात्रावृत्तांत होऊं शकेल. या बाबतींत श्री. गोविंदराव खासगीवाले यांचें एक विधान विचारांत घेण्यासारखें आहे. ते म्हणतात की,

" मराठी भाषेंत अक्षरवृत्तें, अक्षरगणवृत्तें आणि चतुर्मात्रिक गणांनी सिद्ध होणारी मात्रावृत्तें यांचे नवे प्रकार थोडेच आहेत. "

( मराठी छन्दःशास्त्र पान १८ )

प्रस्तुत चर्चेत अमुक वृत्त अमक्याच आवर्तन-प्रकारांतील आहे हें कसें ठरवावयाचें हा मोठा वादाचा प्रश्न आहे. त्याचा निर्णय माधवराव यांनी कोठे दिलेला नाही. ढोबळ मानाने एवढें तरी खास ठरवितां येईल ( असें मी मानतों ) की, ज्या आवर्तनप्रकारांतील एखादें वृत्त आहे असें म्हणावयाचें, त्यावेळीं त्या वृत्ताच्या चरणामध्ये उद्दिष्ट आवर्तनें पूर्ण असलीं पाहिजेत. चरणाच्या शेवटीं एखादें आवर्तन अपुरें राहात असेल तर तें अपुरें आवर्तन विश्रान्तीने ( थांबून ) किंवा आलापाने भरून काढलें पाहिजे, आणि तसें करण्यासारखी तें वृत्त म्हणण्याची चाल असावयास पाहिजे. हा ढोबळ नियम दृष्टीपुढे ठेवून मी पुढील विवेचन केलेलें आहे.

नमुन्याकरिता प्रथम गजलांजलीमधील अष्टमात्रिक आवर्तनी गजलांपैकी एका गजलाचें उदाहरण घेतों. त्या गजलाचा एक चरण व त्याचे अष्टमात्रिक विभाग माधवराव यांच्या मोडणीला अनुसरून खालीलप्रमाणे—

[ केला पद्य । प्रपंच हा क । हाने ]
— — ᴗᴗ ᴗᴗᴗ — — ᴗᴗ

या चरणांत दोन अष्टमात्रिक आवर्तनें पुरीं झालीं असून शेवटीं चार मात्रा शिल्लक राहिल्या आहेत. त्या चार मात्रांच्या भरतीला आणखी चार मात्रा विश्रान्तीने अथवा आलापाने भरून काढतां येण्यासारखी वरील गजल म्हणण्याची चाल असेल तरच हा गजल अष्टमात्रिक आवर्तनाचा समजतां येईल. नाही तर चतुर्मात्रिक आवर्तनाचाच ठरविणें अधिक

इष्ट होईल. कारण यांत चतुर्मात्रिक पांच आवर्तनें सरळपणें पुरीं होतात. या माझ्या मताला पत्रव्यवहारांतील वरील लेखकाचें उत्तर अनुकूल असलेलें वरतीं उध्दृत झालेलेंच आहे.

गजलांजलींतील वर्गवारीच्या क्रमांकावरुन ८८।८९।९३ या क्रमांकाचीं पद्यें षण्मात्रिक आवर्तनी गजलांमधीलच समजणें जरूर आहे. कारण अनुक्रमांक ५२ ते १०० षण्मात्रिक म्हणून निर्दिष्ट करून ठेविले आहेत. परंतु प्रत्यक्ष त्या गजलांचीं पुढे दिलेलीं पद्यें व त्यांच्या आवर्तनांचे लघुगुरु चिन्हांनी दाखविलेले विभाग पाहतां, हे विभाग पंचमात्रिक वा सप्तमात्रिक दिसतात; म्हणजे गैरमेळ किंवा धरसोडच आहे असें म्हणणें भाग पडतें. त्या गज्जलांचा खुलासा असा—

भांडार । लूटवाया । केले प्र । यास वाया । (क्रमांक ८८).
— — ⏑ — ⏑ — — — — ⏑ — ⏑ — —

जमल्यास । आज तारा । अथवा खु । शाल मारा । (क्रमांक ८९)
⏑ ⏑ — ⏑ — ⏑ — — ⏑ ⏑ — ⏑ — ⏑ — —

आशेव । रीं विसंबुनि । हातांत । लें झुगारी । (क्रमांक ९३)
— — ⏑ — ⏑ — ⏑ ⏑ — — ⏑ ⏑ ⏑ — —

सदर क्रमांक ८८।८९।९३ हे गज्जल छन्दोरचना पान २९८ पान २९९ यांत दिल्याप्रमाणे अनुक्रमें आनंदकंद वृत्त, अनुरागवृत्त, व कंदर्पवृत्त, या वृत्तप्रकारांमध्ये बसण्यासारखेच आहेत. परंतु हीं वृत्तें ' भृंगावर्तनी ' म्हणून माधवराव यांनी दाखवून दिलीं आहेत. त्या वृत्तांचा एक एक चरण तुलनेसाठी वाचकांपुढे ठेवितों.

आनंद कंद [ — । — ⏑ – ⏑ । — —, — । — ⏑ – ⏑ । – — ]
आनंद कंद ऐसा हा शाहु बाळ माझा
— — ⏑ — ⏑ — — — — ⏑ — ⏑ — —

अनुराग [ ⏑ ⏑ । — ⏑ । — —, ⏑ ⏑ । — ⏑
अनुराग रंगभूमी जगतींच एक पाही
⏑ ⏑ — ⏑ — ⏑ — — ⏑ ⏑ — ⏑ — ⏑ — —

कंदर्प [ — । — ⏑ — ⏑ । — ⏑ ⏑ — । — ⏑ – ⏑ । — — ]
कंदर्प कांति सुंदर इन्द्रापरी प्रतापी
— — ⏑ — ⏑ — ⏑ ⏑ — — ⏑ — ⏑ — —

वरीलप्रमाणे एकच वृत्त निरनिराळ्या आवर्तन-प्रकारांत दिलें आहे. या धरसोडीवरून किंवा विसंगतीवरून एवढें उघड सिद्ध होतें की, आवर्तन ठरविण्याचें गमक कोणतें, याचा निर्णय माधवराव यांना करितां आलेला नाहीं.

गज्जलांसंबंधीं इतकी चर्चा केली. आता छन्दोरचनेच्या वृत्तविहारांतील कांही पद्मावर्तनी वृत्तें विचारार्थ घेत आहें.

'रामा' वृत्त ( २८० ) [ — — । ⏑ – ⏑ — — । — — ]
रामासि तो म्हणे रे तोका
— — ⏑ — ⏑ — — — —

'उत्थापनी' वृत्त ( २८४ )
[ — — । ⏑ — ⏑ ⏑ ⏑ — । ⏑ ⏑ — ]

प्रमिताक्षरा वृत्त ( २८५ )
[ ⏑ ⏑ — । ⏑ — ⏑ ⏑ ⏑ — । ⏑ ⏑ — । ⏑ ⏑ — ]

या वृत्तांच्या चरणांत आरंभीं व शेवटीं चतुर्मात्रिक एक एक भाग तोडून दाखविला आहे. पण तो तो अपुरा भाग अष्टमात्रिक हिशेबाने कसा पुरा करावयाचा, असा प्रश्न सहजच उद्‌भवतो. त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर न मिळेल तर हीं वृत्तें चतुर्मात्रिक आवर्तनी म्हणजे ' समुद्रावर्तनी ' ठरवितां येण्यासारखीं आहेत. या वृत्तांचे चतुर्मात्रिक

आवर्तन विभाग बरोबर चार पडूं शकतात. मात्रा भराव्या लागत नाहीत. उलटपक्षीं हीं वृत्तें अष्टमात्रिक दोन पुरे आवर्तन-विभाग करून हि दाखवितां येतीलच. परंतु तसें पृथक्करण माधवराव यांनी केलें नाही एवढें खरें. दिलेल्या वरील मोडणींत अष्टमात्रिक तीन आवर्तन-विभाग दाखविण्याचा उद्देश माधवराव यांचा दिसून येतो.

याहून विशेष स्पष्टीकरणार्थ निराळ्या नमुन्याची आणखी कांहीं वृत्तें या खाली देत आहे.

जलधरमाला ( ४४९ )

[ — — — — । ᵕ ᵕ ᵕ ᵕ — — । — — ]

तों ती होती जलधरमाला ज्यो मीं

कासारक्रान्ता ( ४५० )

[ — — — — । — ᵕ ᵕ — ᵕ ᵕ । — — ]

गुणरुचिरा ( २७० )

[ — ᵕ ᵕ — ᵕ ᵕ । ᵕ ᵕ — ]

या वृत्तांच्या चरणांत शेवटीं चार मात्रांचा विभाग आहे. त्या विभागांतील आणखी चार मात्रा विश्रान्तीने ( थांबून ) अथवा आलापाने भरून काढल्या पाहिजेत. परंतु तसें करणें सदर वृत्तांच्या चालीच्या दृष्टीने शक्य अगर इष्ट आहे काय असा प्रश्न पडतो. म्हणून हीं वृत्तें चतुर्मात्रिक आवर्तनी ( समुद्रावर्तनी ) ठरविणेंच सयुक्तिक ठरेल. कारण या वृत्तांत चतुर्मात्रिक आवर्तनें बरोबर पुरीं होऊं शकतात.

यावरून तात्पर्य हें आहे की, अपूर्ण आवर्तन न राहील म्हणजे मात्रा भरून काढण्याची वगैरे जरूरी पडणार नाही, अशा दृष्टीने विचार करून ठरवावयाचें झालें तर, अष्टमात्रिक आवर्तनी ( पद्मावर्तनी ) वृत्तांपैकी आणखीहि कित्येक वृत्तें म्हणजे 'पद्मावर्त' (४४६) 'मणिमाला' ( २२२ ) 'मदलेखा' ( २६१ ) 'मणिचित्र' ( २६२ ) 'चित्रपदा' ( २६३ ) 'अमृतगति' ( २७१ ) 'तृष्णा' ( २७३ ) 'संचल' ( २७४ ) इत्यादि वृत्तें चतुर्मात्रिक आवर्तनीच म्हणजे समुद्रावर्तनी ठरणार आहेत. कारण या वृत्तांचे चतुर्मात्रिक विभागच सरळ व पूर्ण असे पडूं शकतात. अष्टमात्रिक विभाग मात्र सारे पूर्ण पाडतांच येत नाहीत.

छन्दोरचनेच्या प्रथम आवृत्तींत वृत्तांचें पृथक्करण केलें आहे ( पान ४०।४१ ) त्यांत " भानस ( — ᵕ ᵕ ) त्रिगणी वृद्ध म्हणजे सारवती, भानस पंचगणी म्हणजे नील, भानस सप्तगणी वृद्ध म्हणजे उमा, सलगा ( ᵕ ᵕ — ) पंचगणी म्हणजे भ्रमरावली " अशा प्रकारें चतुर्मात्रिक गणाच्या वृत्तांची ( अर्थात् अष्टमात्रिक आवर्तनांत न बसणाऱ्या वृत्तांची ) कल्पना दृग्गोचर झालेली दिसते म्हणून ही गोष्टहि येथे वाचकांच्या नजरेपुढे आणून ठेवीत आहे.

आता यानंतर भृंगावर्तनी वृत्तांपैकी कांही वृत्तें या दृष्टीने निवडतां येतील असें दिसून आलें आहे. तेव्हा त्याबद्दल खुलासा करतो.

वृत्त 'कांचनकांति' ( ७५८ )

[ — ᵕ ᵕ — । — ᵕ — । — ᵕ ᵕ — । — ]

जीव निवे कां बघून कांचन कान्ती

या वृत्ताच्या चरणांत भृंगावर्तनी तीन आवर्तनें पुरीं असून शेवटीं दोन मात्रांचा भाग अपुरा आहे. म्हणजे आणखी चार मात्रांची भरती करणें जरूर आहे. तशी भरती सदर वृत्त म्हणण्याच्या चालीला अनुसरून करतां येण्यासारखी नसेल तर हें वृत्त चतुर्मात्रिक आवर्तनीच

समजणें सयुक्तिक होणार आहे. या वृत्तांच्या चरणांत चतुर्मात्रिक पांच आवर्तनें सरळपणानें भरतात. मात्रा भरून काढण्याची वगैरे कोणती नड राहात नाहीं.

आणखी दोन वृत्तें दाखवितां येतात तीं—

वृत्त ‘ रम्याकृति ’ ( ७५० )
[– – ⏑ ⏑ । – – ⏑⏑ । – – ]
रम्याकृति कोणास न मोही
– – ⏑ ⏑ – – ⏑ ⏑ – –

वृत्त ‘ मंदिराक्षी ’ ( ७५१ )
[⏑ ⏑ – – । ⏑⏑ – – । ⏑⏑ – ]
मंदिराक्षी नजरेने मधु दे
⏑ ⏑ – – ⏑ ⏑ – – ⏑⏑ –

हीं दोन्हीं वृत्तें भृंगावर्तनी प्रकारांत माधवराव यांनी घातलीं असलीं तरी चतुर्मात्रिक आवर्तनी वृत्तांतच समाविष्ट करणें इष्ट होईल. कारण या वृत्तांच्या चरणामध्ये शेवटीं चार मात्रांचा भाग अपुरा राहात असल्याने आणखी दोन मात्रा भरून काढण्याची आवश्यकता भृंगावर्तनांत राहते. पण चतुर्मात्रिक आवर्तनें ठरविलीं तर कांहीच अडचण भासत नाही. चतुर्मात्रिक आवर्तनें चार नीट पुरीं होतात.

असो. येथपर्यंत केलेल्या एकंदर विवेचनावरून स्पष्ट होईल की चतुर्मात्रिक आवर्तनी वृत्तांचा म्हणजे समुद्रावर्तनी वृत्तांचा स्वतंत्र रीतीने वर्ग करून तो छन्दोरचनेंत देणें योग्यच झालें असतें, किंबहुना आवश्यकच होतें असें मला मुख्यतः प्रतिपादन करावयाचें आहे.

‘ पद्मावर्तनी ’ वगैरे वृत्तप्रकार ठरविण्याबाबत माधवरावांची जी विचारसरणी दिसून येते, ती सांभाळूनच मी हें सर्व विवेचन केलें आहे. आवर्तनें ठरविण्यासाठी वास्तविक म्हटलें तर ‘ तालतत्व ’ विचारांत घेणें उपयुक्त होऊं शकेल, किंवा चरणान्तर्गत ‘ यति ’ कसे आहेत ते पाहून तरी त्या यतींच्या धोरणाने आवर्तनविभाग पाडणें सयुक्तिक ठरेल. परंतु ‘ तालतत्व ’ अथवा ‘ चरणान्तर्गत यति ’ यांपैकीं कशालाच प्राधान्य माधवराव यांनी दिलेलें नाही. तसें प्राधान्य देऊन आवर्तनांचा विचार केला आहे असें समजण्यासारखा योग्य आधार मला तरी आढळून आलेला नाही. म्हणूनच हा नवीन विषय मी तज्ज्ञांच्या पुढे विचारार्थ ठेवीत आहें.

“ यति सांगण्याचे बाबतींत पिंगलाची धरसोड आहे ” ( छन्दोरचना पा. ६५ ) तसेंच “ अपितथादि गेय वृत्तें जेव्हा प्राकृत काव्याच्या द्वारा परिणत होऊन संस्कृतांत आलीं तेव्हा पिंगलादि छन्दःशास्त्रकारांस आवर्तनाची कल्पना नसल्याने त्यांचा घोटाळा उडाला.” ( छन्दोरचना पान ५४७ ) असे दोष पूर्वाचार्यांना माधवराव लावतात खरे; परंतु हेच दोष त्यांच्याहि विवेचनांत आहेत !

चतुर्मात्रिक आवर्तनी वृत्तांना मीं ‘ समुद्रावर्तनी ’ असें संबोधिलें आहे. हें नांव माधवराव यांच्या ‘ पद्म ’ वगैरे नांवाच्या पद्धतीला धरूनच आहे. ‘ चार ’ या संख्येला ‘ समुद्र ’ अशी सांकेतिक पूर्वाचार्योंनी उपयोगांत आणली आहे ( पिंगलछन्दःशास्त्र अध्याय ४ सूत्र १२ ) म्हणून तिचा उपयोग येथे मीं केला आहे.

जाति ( मात्रावृत्तें ) प्रकारासंबंधीं सुद्धा वरील दृष्टीने विचार करण्याचा प्रश्न मजपुढे आहे. परंतु तूर्त एवढाच विषय हातीं घेतला होता. अर्थात् तेवढाच पुढे मांडण्याचा प्रयत्न केला आहे. या माझ्या लेखाबाबत कोण काय आक्षेप घेतात तें पाहून मग इतर प्रश्नाकडे वळणें अधिक बरें.

---

# परीक्षणें

**श्रीचक्रधर-चरित्र :—** ( लेखक—डॉ. वि. भि. कोलते; प्रका० अरुण प्रकाशन, मलकापूर; पृष्ठें, २३+३३८=३६१. किंमत रु. ६. )

महानुभावीय वाङ्मयाचे एक साक्षेपी संशोधक डॉ. वि. भि. कोलते यांच्या लेखणींतून उतरलेलें श्रीचक्रधर-चरित्र नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. श्रीचक्रधर हे महानुभाव पंथाचे संस्थापक असल्याने त्यांचें चरित्र आधुनिक दृष्टीने व ऐतिहासिक पद्धतीने लिहिलें जाणें अवश्य होतें, व हें महत्कार्य आपली जबाबदारी ओळखून पार पाडल्याबद्दल डॉ. कोलते हे अभिनंदनास पात्र आहेत. चक्रधरचरित्राची उभारणी करण्यास मुख्य आधार म्हणजे शके १२०० च्या सुमारास म्हाइंभटाने रचिलेला व प्रसिद्ध महानुभावीय संशोधक श्री. ह. ना. नेने यांनी संपादित केलेला ' लीळाचरित्र ' हा ग्रंथ होय. परंतु हें संपादन शास्त्रोक्त रीतीने झालेले नसल्यामुळे प्रथम ' लीळाचरित्रा 'ची पाठशुद्ध संहिता सिद्ध करण्याची आवश्यकता डॉ. कोलते यांनाहि वाटते असें त्यांच्या प्रस्तावनेंतील उद्गारांवरून दिसतें ( पृ. ११ ). आमच्या मतें संहितासिद्धीचें काम त्यांनी प्रथम हातीं घ्यावयास पाहिजे होतें. हें खरें, की प्रस्तुत चरित्रग्रंथाची रचना ' लीळाचरित्रा ' च्या मुद्रित प्रतीवरच केवळ अवलंबून केलेली नसून या कामीं ' लीळाचरित्रा ' च्या मिळतील तेवढ्या म्हणजे सुमारें पंचवीस हस्तलिखित प्रती डॉ. कोलते यांनी उपयोजिल्या आहेत. तरीपण आधी साधनें व मग इतिहास या न्यायाने त्यांनी ' लीळाचरित्रा ' चें शास्त्रोक्त संपादन प्रथम करून मागाहून चरित्ररचना केली असती तर अधिक बरें झालें असतें. झाला प्रकार हा कांहींसा ' आधी कळस, मग पाया ' अशांतील म्हटला पाहिजे. पण त्यामुळे प्रस्तुत चरित्रग्रंथांत कांहीं न्यून राहिलें आहे असें मात्र नव्हे. उलट ऐतिहासिक कसोटी लावून त्याची परीक्षा केल्यास तो निर्दोष उतरला आहे असाच अभिप्राय कोणीहि जाणता देईल. हें चरित्र लिहितांना डॉ. कोलते यांनी आपल्याकडून प्रयत्नांची कसूर कोठेहि होऊं दिलेली नाही. प्रस्तावनेंतील ' लीळाचरित्रा 'ची निर्मिति; त्याचे विविध पाठ, पैकी आम्नाय किंवा पिढीपाठाचें प्रामाण्य, इत्यादि विषयांचें विवेचन लेखकाच्या अभ्यासू वृत्तीचें द्योतक आहे. तसेंच ' लीळाचरित्रा ' च्या मुद्रित प्रतींत न आलेलें पण कांहीं पोथ्यांतून आढळणारें चक्रधरांचें ' शेवटचें प्रकरण ' परिशिष्टांत लीळारूपाने देण्यांतहि लेखकाचा साक्षेप दिसतो. ग्रंथास जोडलेली सामान्यसूची व स्थानसूची यांची उपयुक्तता निर्विवाद असून या दोन सूची सहज डोळ्यांखालून घातल्यास चरित्रलेखनाच्या कामीं लेखकाने घेतलेल्या परिश्रमांची कल्पना येईल. तसेंच चक्रधरचरित्रांतील कांहीं वादविषयक प्रश्नांचा उकल करण्याची डॉ. कोलते यांची रीतहि मोठी अभिनव आणि मार्मिक आहे. विशेषतः चक्रधरांची गुरुपरंपरा, चक्रधर व चांगदेवराऊळ यांचा संबंध, आणि स्वामींचा कालनिर्णय हे विवाद्य प्रश्न सोडवितांना दिसून येणारी त्यांची विवेचक व निर्णायक बुद्धि प्रशंसनीय आहे. त्यांतहि कालनिर्णयाचा प्रश्न मतमतांतरांमुळे व पाठभेदांमुळे फारच गुंतागुंतीचा होऊन बसल्याने व सांप्रदायिक दृष्टि आणि ऐतिहासिक दृष्टि यांत विरोध निर्माण झाल्याने डॉ. कोलते यांना एतत्प्रकरणीं फार सावधगिरीने चालावें लागलें आहे. हीं सर्व विवेचनें

करतांना त्यांनी इतर अभ्यासकांना योग्य तो मान दिला आहे हीहि आनंदाची गोष्ट होय. विशेषत: 'चक्रधरांचें शिक्षण' प्रकरण सजवितांना कै. पंडित बाळकृष्णशास्त्री महानुभाव यांच्या एतद्विषयक अभ्यासाचें ऋण मान्य करण्याची वृत्ति आजच्या जमान्यांत दुर्मिळच म्हणावी लागेल. स्वतंत्र विचार करण्याची शक्ती हें बुद्धिमत्तेचें एक लक्षण मानलें जातें व तें डॉ. कोलते यांजपाशी आहे. स्वतः चक्रधरांनी एकहि ग्रंथ लिहिलेला नाही हें रूढ मत कसें एकांगी आहे व ते ग्रंथकारांचेहि ग्रंथकार कसे होत याविषयींचें त्यांचें विवेचन साधार, सप्रमाण व निर्णायक उतरलें आहे. विशेषतः ग्रंथ व ग्रंथकर्तृत्व म्हणजे काय या प्रश्नाची त्यांनी केलेली समालोचनात्मक चर्चा टीकाशास्त्राच्या दृष्टीने मूलगामी ठरण्यासारखी आहे. डॉ कोलते म्हणतात त्याप्रमाणे "श्रीचक्रधर म्हणजे तत्कालीन समाजांतील एक शास्त्रविद्यासंपन्न, बहुश्रुत व वक्तृत्वकलाकुशल रसिक सत्पुरुष" असल्याने त्याचें चरित्र म्हणजे एका दृष्टीने तत्कालीन महाराष्ट्रीय समाजाचें चरित्रचित्र आहे असें म्हटल्यास चालेल. या दृष्टीने पाहतां चक्रधरांचा परिवार, त्यांच्या मठांतील वातावरण, त्यांची स्वतःची दिनचर्या, त्यांनी सांगितलेला आचारधर्म व त्यांच्या भोवतीं निर्माण झालेलें विरोधांचें वादळ इत्यादि लेखकाने तपशीलवार वर्णिलेलीं प्रकरणें यादवकालीन समाजाच्या अंतरंगाचेंहि जातां जातां दर्शन करुन देतात. तपशिलांत शिरुन ती ती घटना वाचकांपुढे मूर्तिमंत उभी करुन दाखविण्याचें कसब लेखकांत आहे याची साक्ष वरील प्रकरणांतून मिळते. तसेंच लेखकाच्या ठिकाणीं त्या त्या रसाचा आस्वाद घेणारें कविमनहि आहे, यांचें प्रत्यंतर चक्रधरचरित्रांतील गृहत्याग किंवा देहान्त यांसारखे प्रसंग व स्वामींची भ्रमंती, आयुष्यक्रम किंवा स्वभावविशेष यांसारखे विषय यांच्या वर्णनांतून मिळतें. इतिहासासारखा नीरस विषय डॉ. कोलते यांच्या लेखणींतून इतका सरस उतरला आहे, की हें चरित्र वाचतांना आपण एकादी करुणरम्य कथाच वाचीत आहों असें वाटतें. मूळ 'लीळाचरित्र' सरस असलें तरी त्यांत पाल्हाळ व पुनरुक्ति यांचा चोथाहि पुष्कळ आहे. शिवाय तें आठवणींच्या स्वरूपाचें असल्याने रचनादृष्ट्याहि विस्कळित वाटतें. मूळांतील हे दोष डॉ. कोलते यांनी आपल्या ग्रंथांत येऊं दिलेले नाहीत. त्यांचें चरित्र आकाराने आटोपशीर, रचनादृष्ट्या ठाकठीक व आंतील आशयाच्या दृष्टीने सूत्रबद्ध वाटतें. एकूण, आधुनिक दृष्टि ठेऊन, ऐतिहासिक पद्धति वापरून, व वर्ण्यविषयाशीं समरस होऊन काढलेलें एका महान् व्यक्तीचें हें चरित्रचित्र त्या व्यक्तीच्या लौकिकास साजेसें उतरलें आहे यांत कांही शंका नाही.

पण जगांत निर्दोष असें काय आहे ? आणि कांही नसेल तर प्रस्तुत ग्रंथ तरी या नियमास अपवाद कां असावा ? आपली भूमिका विशद करतांना प्रस्तावनेंत डॉ. कोलते म्हणतात, "प्रस्तुत चरित्र लिहितांना प्रामुख्याने महानुभाव वाचक दृष्टीसमोर ठेवलेले आहेत. त्यामुळे महानुभावपंथीयांच्या श्रद्धांना धक्का लागणार नाही अशी सर्वत्र काळजी घ्यावी लागली आहे. तथापि इतर वाचक माझ्यासमोर मुळींच नव्हते असा मात्र याचा अर्थ नाही. त्यांच्यासाठीच लौकिक दृष्टीनेहि चक्रधरस्वामींकडे पाहण्याचा प्रयत्न मी केलेला आहे" (पृ. १४). वरील विधानें मोठीं सूचक आहेत. एकीकडे सांप्रदायिक दृष्टि ठेऊन पंथीयांचें समाधान करावयाचें तर दुसरीकडून इतरेजनांसाठी म्हणून लौकिक दृष्टिहि ठेवावयाची अशा दुहेरी पेचांत चरित्रकार सापडलेले दिसतात. प्रत्यक्षांत झालें मात्र असें, की सर्वांचें समाधान करण्याच्या प्रयत्नांत कोणाचेंच समाधान होऊं नये, या न्यायाने धड ना सांप्रदायिक, धड ना लौकिक अशी विचित्र अवस्था या चरित्राची झाली आहे. कारण सांप्रदायिक म्हणावें तर त्यांत

कांही गोष्टी अशा आहेत की ज्या पंथीयांस रुचणार नाहीत असें स्वतः लेखकच म्हणतात (प्रस्ता. पृ. १५); आणि तें लौकिक स्वरूपाचें म्हणावें तर त्यांत स्वतः चरित्रकाराचाहि ज्यांवर विश्वास दिसत नाही अशा चमत्कारांचें भारूड 'स्थित्यानंद व विज्ञान' या प्रतिष्ठित नांवाखाली लावलेलें आढळतें. आमच्या माहितीप्रमाणे डॉ. कोलते हे चिकित्सक आहेत, भाविक नाहीत. तसेंच महानुभावपंथीयांचें आराधन करण्यांत त्यांची भूमिका कोणती तेंहि आम्ही समजूं शकतों. पण अशा रीतीने दोन दरडींवर हात ठेऊं पाहण्याच्या प्रयत्नांत चरित्रवस्तूला थोडा धक्का लागला आहे असें आम्हांस वाटतें. कारण एकदा पंथीयांच्या श्रद्धेला जपावयाचें म्हटलें, की चक्रधर हा परमेश्वराचा पूर्णावतार असून त्याची प्रत्येक 'लीळा' समर्थनीय होय या पंथीय सिद्धान्ताचा निमूटपणें स्वीकार करणें ओघानेच येतें. तसा तो केल्यामुळे कांही भलभलत्या प्रकारांचें समर्थन करण्याचा प्रसंग डॉ. कोलते यांनी स्वतःवर ओढवून घेतला आहे. एका तेलिणीशीं शय्यागमन किंवा आऊसा नांवाच्या शिष्येकडून करविलेलें नग्ननृत्य यांसारख्या चक्रधरस्वामींच्या 'लीळां' चें समर्थन कोणीं झालें तरी कसें करणार? तुलना करूं नये, पण " जन्मतेनि प्रसंगें । स्त्रीदेह शिवणें आंगें । तेथौनि जन्म आघवें । सोवळें कीजे ॥ " या स्ववचनाप्रमाणे चालणारे ज्ञानेश्वर कोठें आणि 'स्थित्यानंदा' च्या नांवाखाली वरील 'लीळा' करणारे चक्रधर कोठे असा विचार मनांत आल्यावांचून रहात नाही. पण एकदा चक्रधर हे परमेश्वराचे पूर्णवतार होत हें मान्य केलें म्हणजे त्यांच्या प्रत्येक कृतीचें समर्थन करणें येतें व डॉ. कोलते यांनी तसें केलें आहे. यांतून दुसरी एक आपत्ती त्यांच्यावर ओढवली आहे. चक्रधर हा एक हुतात्मा किंवा मार्टियर म्हणून रंगविणें त्यांना भाग पडलें आहे. चक्रधरांचा वाढता लौकीक आणि शिष्यसमुदाय इतर समाजश्रेष्ठींना व धर्मधुरीणांना पाहवेना व याचा परिणाम त्यांच्याभोवती विरोधाचें वादळ निर्माण होण्यांत आणि शेवट चक्रधरवधांत झाला. डॉ. कोलते यांनी काढलेला निष्कर्ष बरोबर नाही. अहिंसा, भूतदया, विरक्ति, निःस्पृहता इत्यादि गुणांनी शोभून दिसणारी चक्रधर ही एक असामान्य विभूति होऊन गेली व महाराष्ट्राच्या चरित्रपटावर तिने आपला ठसा स्पष्टपणें उमटविला हें कोणीहि मान्य करील. पण याचा अर्थ चक्रधराचा संप्रदाय इतका वाढला, की " तो थोपवून धरण्यासाठी ज्ञानेश्वरांना भागवत संप्रदायाची नवीन फळी उभारावी लागली " असा जो डॉ. कोलते करतात (प्रस्ता. पृ. २१) तसा तो करतां येणार नाही. ज्ञानेश्वरांचें कार्य स्वतंत्र आहे; तें चक्रधरसापेक्ष नाही, हें एक. आणि दुसरें असें, की चक्रधरांच्या ठायीं 'बाहुल्यें स्त्रियांसीचि वेधु' अशी जी त्यांची कीर्ति झाली होती ती कांही अगदीच अकारण नव्हे. उपरिनिर्दिष्ट व आणखीहि कांही अशाच विपरीत 'लीळा' पाहून समाजाच्या मनांत कांही किंतु उत्पन्न झाला तर त्याबद्दल समाजास बोल काय म्हणून लावावा? किंबहुना आम्ही अन्यत्र म्हटल्याप्रमाणे या सामाजिक विरोधाचें रहस्य खुद्द चक्रधरांच्या कांही विशिष्ट आचारांत असावें. चक्रधर स्वतः थोर व विशुद्ध मनाचे असतील; नव्हे, होतेच. परंतु 'मार्गाधारें वर्तावें' या तत्वाचा विसर पडल्याने त्यांच्या हातून समाजाच्या दृष्टीने विपरीत असें वर्तन घडलें यांत शंका नाही. जीवन्मुक्तानेहि लौकिक सांभाळून वागावें लागतें. तसा तो वागणार नाही तर त्यांचा 'चक्रधर' होईल हें प्रस्तुत चरित्र ग्रंथाचें सार आहे.

वरील विवेचन म्हणजे दोषदर्शन नसून मतभेददर्शन आहे. त्यामुळे डॉ. कोलते यांच्या चरित्रग्रंथास कांही कमीपणा येतो असें मुळींच नाही. असो. लेखकाच्या भाषाविषयक धोरणाविषयीहि दोन शब्द लिहिणें जरूर वाटतें. डॉ. कोलते हे 'उच्चारानुसारी लेखनपद्धतीचे'

पुरस्कर्ते आहेत हें सर्वांना ठाऊकच आहे. त्यांच्या या मताविषयी आम्हांस येथे कांहीच म्हणावयाचें नाही. परंतु अद्यावत् (अद्ययावत्) प्रस्ता. पृ. ११, आउसाचें (आउसेचें) पृ. २६६, राहायचे-लागायचे (-वयाचे) पृ १६९, रानामधे (-मध्ये) पृ. १६९, यांसारखे अपप्रयोग लेखकाच्या लेखनविषयक भूमिकेंतून न कळत जन्मास येतात असें आम्हांस वाटतें. डॉ. कोलते हे स्वतः जाणते आहेत. परंतु जे नेणते आहेत असे लेखक हा आदर्श म्हणून पुढे ठेवतात व त्यामुळे भाषा अधिकच भ्रष्ट होत जाते. हें ध्यानांत घेऊन डॉक्टरसाहेबांनी आपल्या धोरणाचा पुनर्विचार करावा अशी आमची त्यांना नम्र विनंति आहे. तसेंच 'कालनिर्णया' वरील भागांत श्री. हरिभाऊ नेने यांच्या एका लेखांतील कांही विशिष्ट शब्द पुनः पुन: उध्दृत करून लेखकाने कांही विशेष साधलें असें आम्हांस वाटत नाही. उलट यामुळे टीकेस कांहीसें वैयक्तिक स्वरूप येऊन संशोधनांतील शुचिता थोडी ढळते.

असो. ग्रंथपरीक्षणास पूर्णता यावी म्हणून वरील मजकूर लिहिला. वस्तुतः डॉ कोलते यांच्या या ग्रंथांत गुणच इतके आहेत, की एखादादुसरा दोष त्या गुणसागरांत कोठे नाहीसा होऊन जातो तें कळतहि नाही. अशा प्रकारें, एका पंथसंस्थापकाचें व थोर विभूतीचें चरित्र लिहून डॉ. कोलते यांनी मराठी वाङ्मयाच्या व संस्कृतीच्या अभ्यासकांस उपकृत करून ठेवलें आहे. या आधुनिक म्हाइंभटांचें हें आधुनिक लीळाचरित्र 'सर्वज्ञां'च्या चरणीं रुजू होवो!

—शं. गो. तुळपुळे

**माधव जूलियन**—(लेखक : श्री. गं. दे. खानोलकर; प्रकाशक : स्वस्तिक प्रकाशन, मुंबई. मूल्य रु. ५-८ पानें २७६.)

कै. माधवराव पटवर्धन उर्फ कवि माधव जूलियन यांच्यावर आजवर पुष्कळच लिखाण प्रसिद्ध झालें आहे. त्यांमधे संकलित स्वरूपांत आठवणीरूपाने प्रसिद्ध झालेल्या कै. लीलाबाई पटवर्धन यांच्या 'आमचीं अकरा वर्षें' या पुस्तकाचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. त्यानंतर आता माधवरावांच्या जीवनाची कथा निवेदून व वाङ्मयाचा थोडाफार परामर्ष घेऊन, कांही नवीन माहिती उपलब्ध करून देण्याचें काम 'मराठी वाङ्मयसेवकाचे' लेखक श्री. गंगाधरराव खानोलकर यांनी 'माधव जूलियन्' या चरित्रग्रंथांत केलें आहे. श्री. खानोलकर हे माधवरावांच्या सुपरिचितांपैकी एक प्रमुख गृहस्थ असून, त्यांना माधवरावांच्या सहवासाचा लाभ मधून मधून घडलेला आहे; तसेंच माधवरावांच्या वाङ्मयाचें गाढ परिशीलन करणारे ते एक आस्थेवाईक अभ्यासू आहेत. त्यांनी माधवरावांच्या जीवनाशीं संबंधित अशा पुष्कळशा व्यक्तींच्या गांठीभेटी घेऊन किंवा त्यांच्या जवळचा पत्रव्यवहार, आठवणी, आत्मचरित्रादि साधनांचा अभ्यास करून हें चरित्र लिहिण्यास हात घातला आहे. श्री. खानोलकरांची भाषा रसाळ असल्याने चरित्रलेखनास ती सर्वथा योग्य आहे. अशा साधनसामुग्रीच्या आधाराने हें चरित्र लिहिलें गेल्याने, त्याला पुष्कळसें सोज्वळ व भरीव स्वरूप प्राप्त झालें आहे. त्यामुळे अपुरी माहिती असलेल्यांचें किंवा मुळींच माहिती नसलेल्यांचें या चरित्राने पुष्कळसें समाधान होईल. परंतु चरित्रलेखनाचीं सर्व व्रतें काटेखोर निष्ठेने न पाळल्यामुळे या चरित्रांत अनेक चुका झाल्या आहेत व उणीवा राहून गेल्या आहेत. चरित्रलेखक हा केवळ भावनाशील असून चालत नाही. तो समतोल बुद्धीचा, विवेकशील व हातीं आलेल्या पुराव्याची चिकित्सक बुद्धीने छाननी करून योग्य तो निवाडा

देणारा निःपक्षपाती न्यायाधीशहि असला पाहिजे. तो जसा एका विशिष्ट पक्षाचा वा पंथाचा असून चालत नाही, त्याचप्रमाणे चरित्रीभूत व्यक्तीशीं संबंध आलेल्यांमधे आपल्या आवडी-निवडीनुरूप तरतमभाव ठेवणाराहि असतां कामा नये त्याला केवळ सत्याचें दर्शन घडवावयाचें असतें म्हणून त्यानें सहेतुक वा अहेतुक अनुल्लेख, प्रतारणा वा छपवाछपवी करतां कामा नये. माधवरावांचे असंख्य मित्र अजून हयात आहेत त्या सर्वांकडून श्री. खानोलकरांनी हरएक बाबतींत माहिती घेतली असेलसें वाटत नाही. तसेंच हें चरित्र पूर्वीच्या त्यांच्या 'विजापूरकरांच्या' चरित्राप्रमाणेच हातावेगळें करण्याची त्यांस घाई झाली असावी. त्यामुळे प्रस्तुत चरित्र म्हणजे माधवरावांच्या जीवनावरील अगदी 'शेवटचा शब्द' असें वाटत नाही.

कै माधवरावांचें जीवन अत्यंत गुंतागुंतीचें होतें. त्यांच्या जीवनांत घडलेल्या घटना लोकविलक्षण होत्या. त्यांचें व्यक्तिमत्व अत्यंत ठसठशीत, भरदार व महत्त्वाकांक्षेने प्रेरित झालेलें असलें, तरी त्याची घडण कांहीं वेळां अगदी सूक्ष्मसंवेदनांच्या आघातांनी अधिक गुंतागुंतीची झालेली आहे. त्यांची वृत्ति शूर, हळुवार, झुंजार पण प्रसंगोपात्त अव्यवहारी व त्यांचीं कांहीं जीवनमूल्यें स्थिर, तर कांहीं सारखीं बदलणारीं अशीं होतीं. अशा व्यक्तीचें चरित्र लिहिणें किंवा चित्रण करणें ही फार अवघड गोष्ट आहे. अशा वेळीं आपलीं साधनें नीट पडताळून पाहून, औचित्य न गमावतां लिहिणें म्हणजे कड्यावरून चालणेंच आहे. विशेषतः चरित्रीभूत व्यक्तीचा संबंध अनेक व्यक्तींशीं, संस्थांशीं वा घटनांशीं असल्यामुळे, त्यासंबंधीं कोणतेंहि एखादें विधान करतांना, त्या त्या व्यक्तीला, संस्थेला वा प्रत्यक्ष चरित्रीभूत व्यक्तीलाहि अन्याय न करतां लिहावयाचें म्हणजे कठिणच काम आहे. त्या दृष्टीने पाहिल्यावर या चरित्रांत अपुरेपणा वाटतो. दुसरें असें की, माधवराव हे श्रेष्ठ साहित्यिक व नामवंत कवि असले, तरी ते माणूसच होते; आणि कांहीं कांहीं वेळा तर गोंधळून गेल्यामुळे ते अव्यवहारीहि बनत. अशा स्थितींत त्यांच्या गुणांचें व दोषांचेंहि चित्रण होणें जरूर होतें. तसेंच हें चरित्र म्हणजे जर 'जीवनकथा' आहे, तर त्यांत इतरांच्या उताऱ्यांपेक्षा वा अवतरणांपेक्षा निवेदनाचा वा कथानकाचा भाग अधिक असावयास हवा होता. चरित्रग्रंथ वरवर चाळला असतां मनांत जीं शंकास्थळें निर्माण होतात तीं अशीं: —

माधवरावांनी बडोद्यांत असतांना घर सोडण्याचें खरें कारण कोणतें ?, 'त्यांचा एका सहाध्यायिनीशीं गाढ स्नेह जुळून आला'—ही सहाध्यायिनी कोण ?, त्यांना 'जूलियन' हें नांव कोणीं व कोणत्या प्रसंगीं दिलें, 'जूलियन् अँडरले' याला कांही संदर्भ आहे काय ?' 'बडोदें मिशनरींत कविता प्रसिद्ध झाल्यावर माधवरावांना खरोखरीच त्रास झाला नाही काय ?' 'रविकिरणमंडळाच्या हेमांबुज–वादांत (पा. ७४) शुक्र पिवळा असल्याचे दृक्प्रत्ययाचे उद्गार प्रथम रानड्यांनी काढले की इतर कोणीं ?', त्या वादांत पक्षोपपक्ष कसे होते ?, 'वीणाझंकारांतील 'पूर्तता, स्थानभ्रष्ट फुलास व लाजविलेला गुलाब' हीं अनुकरणेंच होतीं काय ?, 'सुनीत हें नांव कुणीं सुचविलें ? (पहा—कुलकर्णी-बुद्धिसागरकृत. 'मराठी सुनीत' प्रस्तावना पा. ३०, ओळ २४), 'प्रा. जोग (पा. ८०) म्हणजे कोणते जोग ?', रानडे यांनी माधवरावांना 'तें' महत्वाचें पत्र लिहण्याआधीं श्री. घाटे यांच्या घरीं जी एक महत्वाची बैठक झाली, तींत माधवरावांची बाजू कोणीं कोणीं घेतली होती ?, फर्ग्युसन कॉलेज–प्रकरणीं पुढे आलेलें 'पत्र' कोणाला आलें होतें ? तें पत्र कोठे आहे ? लीलाबाईशीं लग्न घडवून आणण्यासाठी मध्यस्थी कुणीं कुणीं केली ?, फर्ग्युसनकॉलेजप्रकरणीं

सर्व दोष कॉलेजच्याच माथीं पडतो काय ? ' शाहुराव कानिटकर ' यांच्या कर्जाची इतकी सविस्तर माहिती देण्याने काय साधलें ? लीलाबाई व माधवराव यांच्या खाजगी एकांतांतील गोष्टी त्यांनी पत्रांत एकमेकांना लिहिल्या असल्या, तरी त्या प्रकटपणें द्यावयास हव्याच होत्या काय ? छंदोरचनेचे खरे प्रेरक कोण कोण ? D. Litt. च्या परीक्षकांत प्रथम ' म. म. कोण ' होते की ' डॉ पी. एल्. वैद्य ' होते ? मृत्यूच्या वेळीं त्यांच्याजवळ कोण कोण होते ? वगैरे अनेक शंका मनांत उद्भवतात व त्यांचीं समाधानकारक उत्तरें मिळत नाहीत, हें खास.

पण हे दोष सोडले तर माधवरावांसंबंधीं इतकी विस्तृत माहिती देणारें चरित्र मराठींत दुसरें नाहीं. जीवनकथा सांगतांना त्यांच्या कांही कवितांच्या पार्श्वभूमि सांगितल्याने पुष्कळ गोष्टींवर प्रकाश पडला आहे. तसेंच पुष्कळ ठिकाणीं चरित्रकाराने आपलीं मतें व्यक्त केल्याने व अधिकृत उतारे दिल्याने ते ते प्रसंग मनांत ठसण्यास चांगली मदत होते. श्री. खानोलकरांची या चरित्रलेखनाच्या कामीं असलेली आत्मीयता विशेष स्पृहणीय आहे. साधनांची जुळणी करण्याचें त्यांचें कौशल्य, भाषेचा रसाळपणा व अंतःकरणांतील ओलावा यांनी हें चरित्र रंजक झालें आहे. विशेषतः ' मी प्रेमोद्यानांतील बुलबुल आहे ' हें पहिलें प्रकरण, ' साहित्यिक जीवनाचा प्रभातकाळ ' हें सातवें प्रकरण, ' प्रेम होईना तुझ्याने ' हें दहावें प्रकरण व शेवटचें एकविसावें ' प्रयाण ' हें प्रकरण, हीं सर्वच सरस उतरलीं आहेत. म्हणून श्री. खानोलकरांचें मी अभिनंदन करतों व माधवरावांचा सर्व पत्रव्यवहार नीट जपून ठेवल्यामुळे मराठी साहित्यावर जे उपकार झाले आहेत, त्याबद्दल माधवरावांचे जिवलग मित्र श्री. रा. वि. मराठे यांना मी धन्यवाद देतों.

—शं. के. कानेटकर.

कालसमुद्रांतील रत्नें-रत्नकरंडक १ व २. [ लेखक :—बॅ. गो. वि. देशमुख, नागपूर. किंमत प्रत्येकीं ४ रुपये ]

लेखकाच्या आयुष्यांत ज्या चटकदार घटना घडल्या आणि ज्या अनेक व्यक्तींशीं त्याचा संबंध आला त्यांचें अत्यंत कौशल्यपूर्ण व मनोरंजक चित्रण ह्या द्विभागात्मक ग्रंथांत लेखकाने केलें आहे. वर्धा जिल्ह्यांत मोडणारें वाढोणें हें एक लहानसें खेडेगांव आहे. पण वाढोण्याच्या देशमुखांवर लक्ष्मीप्रमाणे सरस्वतीचाहि वरदहस्त होता. नागपूरकर भोसल्यांच्या तालमींत त्यांनी बहादुरीने तलवार मारली आणि सुभेदारी गाजविली. धर्मनिष्ठ, रुबाबदार, शिस्तप्रिय, पराक्रमी व स्वदेशाभिमानी असें हें नामांकित घराणें आहे. ह्या पुस्तकांत केवळ ह्या घराण्याचाच नव्हे तर नागपूर प्रांताचा १८९२ ते १९५२ अशा साठ वर्षांचा सर्व प्रकारच्या सार्वजनिक चळवळींचा इतिहास ग्रथित झाला आहे. १९२२ पर्यंतचा आढावा पहिल्या भागांत आणि पुढील तीस वर्षांचें समालोचन दुसऱ्या करंडकांत आलें आहे. आत्मचरित्र हें ग्रंथाचें खरें स्वरूप आहे. इतिहासाची पार्श्वभूमि असल्याशिवाय आत्मचरित्राचे पैलू चमकदार दिसणें अशक्य ! ह्या चार बंधूंपैकी आबाजींनी देशमुखी सांभाळली व तिचा गौरव वाढवला, गोविंदरावांनी नागपूरच्या सार्वजनिक जीवनांत पुढाकार घेतला, गोपाळरावांनी मुंबईस शस्त्रक्रियेच्या व्यवसायांत आणि सार्वजनिक जीवनांत अतुलनीय यश संपादन केलें आणि दामुअण्णांनी कोल्हटकर, तुळजापूरकर, डॉ. साठे व डॉ. वेलकर यांच्या संगतीने मुंबईच्या तत्कालीन देशभक्तांचें पंचायतन मंडित केलें. ह्या जवळजवळ पांचशे पृष्ठांच्या आत्मचरित्राची

कथा कादंबरीप्रमाणे रसाळ व मनोवेधक झाली आहे. ह्यांत रंगविलेलीं व्यक्तिचित्रें अस्सल रत्नें होत. पहिल्या भागाला लोकनायक बापूजी अणे आणि दुसऱ्या भागाला प्राचार्य प्रा. डॉ. शंकरराव पेंडसे यांच्या रसग्रहणपर मार्मिक प्रस्तावना लाभल्या आहेत. रसिकाग्रणी बाबासाहेब खापर्डे यांनी ग्रंथाचा पुरस्कार केला आहे. देशमुख-बंधू महाराष्ट्राचे व मराठी भाषेचे अभिमानी आहेत. लोकमान्य टिळकांचे अनुयायी म्हणवून घेण्यांत त्यांना भूषण वाटतें. त्यांची मल्लविद्येची आवड व लढाऊ कुस्तीगिरी त्यांच्या विद्वत्तेला, व्यवसायाला, आणि सार्वजनिक कार्याला भूषणभूतच ठरली. पुस्तकाची भाषा तडफदार आहे. गोविंदरावांना कालसमुद्रांतून आपली जीवन-नौका हाकारींत असतां जीं अमोलिक रत्नें गवसलीं, त्यांनी अलंकृत झालेलें वाढोणेकर देशमुखांचें हें कीर्तिमंदिर मराठी साहित्यांत खात्रीने अमर ठरेल.

—नारायण केशव बेहेरे

आत्मचरित्र : ले. गुरुवर्य नी. धों. लिमये, जयश्री प्रकाशन, धंतोली नागपूर, पृष्ठें २४०. किंमत ४ रुपये).

अशक्त प्रकृती, दरिद्री भिक्षुक घराण्यांत जन्मलेल्या, केवळ चार मराठी यत्ता शिकलेल्या अशा एका कष्टाळू नम्र वृत्तीच्या पण समाजसेवातत्पर व्यक्तीचें हें जवळजवळ चारशे पानांचें सुबोध परंतु रसाळ आत्मचरित्र आहे. पोटासाठी भटकत भटकत हा १८ वर्षांचा तरुण दक्षिण महाराष्ट्र सोडून सातशे मैलांवर जबलपूरला स्थायिक झाला. हा हिंदी मुलुख. येथील महाराष्ट्रीय मुलांना त्याकाळीं हिंदींतूनच प्राथमिक शिक्षण घ्यावें लागे. पण लिमयांनी तेथे १८९३ त मुलांमुलींसाठी मराठी शिक्षणाचे खाजगी वर्ग मातृभाषेच्या तळमळीने चालू केले पोटासाठी भिक्षुकीचा जोडधंदा होताच. त्या प्राथमिक मराठी शाळेचा हीरक-महोत्सव नुक्ताच मोठ्या थाटामाटाने साजरा झाला. आज एक हजार मुलामुलींना मराठींतून शिक्षण देणारें हायस्कूल जबलपूरला चालू आहे. लिमयांनी पेरलेल्या बीजाचा मोठा वृक्ष निर्माण झाला. लिमयांची नम्रता, सेवातत्परता व कळकळ हे गुण फलद्रूप झाले. लिमयांच्या आत्मचरित्रांत जबलपूर येथील मराठी शाळेचा इतिहास साहजिकच आला आहे. गोविंदराव देशमुखांनी मायभाषेला रत्नजडित हार घातला; तर लिमयांनी सुगंधी पुष्पें वाहून तिची पूजा बांधली.

—नारायण केशव बेहेरे

मीं पाहिलेले गांधीजी : (लेखक व प्रकाशक, श्रीपाद जोशी, किं. १२ आणे.)

परभाषेतील उत्तम कलाकृतींचें मराठींत भाषांतर करून त्या कलाकृतींचें स्वाभाविक दर्शन मराठी वाचकांस घडविणारे श्री. श्रीपाद जोशी यांनी पूज्य महात्मा गांधींच्या सहवासांत टिपून घेतलेल्या सुंदर क्षणांचें पुनर्दर्शन या लहानशा पुस्तकांत घडविलेलें आहे. या थोर राष्ट्रपित्याचा सहवास कसा लाभला आणि त्या त्या विशिष्ट क्षणाला स्वत:ची भूमिका कशी राहिली याचें प्रामाणिक दिग्दर्शन लेखकाने येथे केलें आहे. विशिष्ट प्रसंगांची नोंद करीत असतांना लेखकाने त्या प्रसंगांतील स्वाभाविकपणा तसाच ठेवण्याची कसोशीने दक्षता घेतल्या-मुळे हें पुस्तक वाचीत असतांना आपल्या प्रस्तावनेच्या अखेरीस श्री. काकासाहेब कालेलकर

अनुक्रमणिका

यांनी म्हटल्याप्रमाणे १९४२ सालच्या तरुण मनाने पाहिलेला व अनुभवलेला "एक ऐतिहासिक दस्तऐवज" आपल्या हातीं आल्याचा आनंद निःसंशय होतो.

"श्रीपादची मला चांगली आठवण आहे.तो शूर आहे आणि सगळ्या आपत्तींना तो आनंदाने तोंड देईल. तुम्ही त्याला पुन्हा भेटाल तेव्हा त्याला माझे सप्रेम शुभाशीर्वाद सांगा." येरवडा येथील तुरुंगांत सक्तमजुरीची शिक्षा भोगीत असतां १७ जुलै रोजीं (१९४४) गांधीजींकडून आलेल्या पत्रांतील या मजकुराने स्वतःला लाभलेल्या नीतिधैर्यापासून तों श्री. श्रीपाद जोशी यांनी वर्धा सोडल्यानंतर "आपका पत्र पू बापूको मिला। वे आशा रखते हैं कि हवा बदलीसे आपकी सेहतको वहुत लाभ पहुँचेगा।" अशा प्रकारचें पितृतुल्य प्रेम दर्शविणारें राजकुमारी अमृत कौर यांच्या वतीने गांधीजींकडून आलेल्या पत्रापर्यंतच्या अनेक बारीकसारीक हृदयंगम आठवणी या लहानशा पुस्तकांत गोवल्या आहेत.

या पुस्तकांतील भाषा चटकदार असून लेखनपद्धतीहि आकर्षक आहे. लहानमोठ्या सर्व वाचकांनी एकवेळ हें पुस्तक जरूर वाचून काढावें.

—सरोजिनी बाबर.

कमळण—ले. अरविंद गोखले
कबुतरें —ले. गंगाधर गाडगीळ
प्रकाशक: पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७.
किंमत ३ रु. प्रत्येकी.

मराठी लघुकथेचें स्वरूप गेल्या दहा वर्षांत पुष्कळच बदललें आहे. आजची मराठी लघुकथा अधिकाधिक अन्तर्मुख व व्यक्तिप्रधान होऊं लागली आहे. तिच्या अनुभूतीच्या कक्षा अधिक व्यापक झाल्या आहेत; व ती समाजांतील विविध थरांतील जीवनाचें दर्शन मोठ्या कलात्मकतेने घडवूं लागली आहे. पात्रांच्या अन्तरंगाचें दर्शन घडवितांना केवळ वरवरच्या भावनांवर भर न देतां ती मानवी मनांत अधिकाधिक खोल शिरून त्याच्या अन्तर्मनांतील भावनांची गुंतागुंत व विसंगति उलगडून दाखविण्याचा प्रयत्न करूं लागली आहे. त्यामुळें मानवी मन व भोवतालच्या परिस्थितीची त्यावर होणारी क्रिया व प्रतिक्रिया हे आजच्या कथालेखकाचे महत्त्वाचे विषय झाले आहेत. थोडक्यांत आजची कथा स्थूलाकडून सूक्ष्माकडे वळली आहे.

अरविंद गोखले यांचा 'कमळण' व गंगाधर गाडगीळ यांचा 'कबुतरें' हे कथासंग्रह वाचतांना आजच्या कथांच्या वरील वैशिष्ट्यांची पूर्ण कल्पना येते. आजच्या मानवापुढे ज्या अनेकविध समस्या उभ्या राहिल्या आहेत, जी एक जीवनाविषयी अश्रद्धा त्याच्या मनांत निर्माण झाली आहे, परिस्थितीमुळे त्यांचा जो कोंडमारा होत आहे त्यामुळे आजचा मानव विकल व अगतिक झाला आहे. अशा मानवाचें दर्शन गोखले–गाडगीळांच्या अनेक कथांतून आपणांला घडतें. अरविंद गोखले यांच्या 'कमळण', 'कामचक्र', 'दिवा जळत नाही' या किंवा गंगाधर गाडगीळ यांच्या 'वारा भरलेलें शीड,' 'पांच रुपये,' 'खुळी' या कथा या दृष्टीने वाचण्यासारख्या आहेत. संसारांतील पहिल्या-वहिल्या आणि सोनेरी स्वप्नांतून जागी होऊन वैफल्याची, निराशेची, व क्षुद्रपणाची जाणीव झाल्याने विपण्ण व अस्वस्थ झालेली कमला, आपलें पहिलेंच बिऱ्हाड वेश्यावस्तींत करावें लागत आहे म्हणून बावरलेला वासू, आपल्या प्रियकराला शारीरिक पावित्र्याची महती पटविणारी विलक्षण संयमशील मेधा, कामचक्रांतून बाहेर पडून आपली बौद्धिक उन्नति करून घेण्याचा निश्चय करणारा व त्या निश्चयाशीं

झगडणारा 'कामचक्र' या कथेचा नायक......या सर्व व्यक्तींचें चित्रण अरविंद गोखले यांनी इतक्या कलात्मकतेने व सूक्ष्मपणें केलें आहे व तें करतांना त्या त्या व्यक्तीच्या भावजीवनाशीं ते इतके एकरूप झाले आहेत की त्यामुळे त्या व्यक्ति एक विशिष्ट आकार घेऊन आपणापुढे उभ्या राहतात. श्री. अरविंद गोखले यांचें मनोविश्लेषण अधिक सूक्ष्म आणि खोल आहे तर गंगाधर गाडगीळ यांचें मनोविश्लेषण अधिक व्यापक व रुंद आहे. पात्राचें मनोविश्लेषण करतांना अनेक तपशीलाची ते त्याला जोड देतात, परिस्थितीची व सामाजिक वातावरणाची पार्श्वभूमि ते त्या व्यक्ति-भोवती उभी करतात. त्यामुळे त्यांच्या व्यक्तिचित्रणांत अधिक व्यापकता येते. 'कबुतरें' या संग्रहां-तील सतत कांगावा करणाऱ्या शशिकलेचें, शिडांत वारा भरलेल्या गलबताप्रमाणे सतत कांही तरी कार्य करीत जगन्मित्र बनण्याचा प्रयत्न करणाऱ्या चितळ्यांचें, विभूतिपूजनापायीं स्वतःचें जीवन उध्वस्त करणाऱ्या वत्सलेचें चित्रण पाहिलें म्हणजे त्या त्या व्यक्तींच्या बारीकसारीक स्वभाववैशिष्ट्यांचें दर्शनहि त्यांनी किती चातुर्याने घडविलें आहे याची आपणांला साक्ष पटते. पण त्याहिपेक्षा त्यांनी 'कबुतरें' 'घरांतला चोर' आणि 'शामचें गुपित' या कथांतून बालमनाचें जें दर्शन घडविलें आहे त्यांमुळे त्यांच्या प्रतिभेचा एक नवाच पैलू आपल्या डोळ्यांसमोर येतो. विजय, उदय, दिनू, मधू व श्याम हीं मुलें त्यांच्या त्यांच्या वैशिष्ट्यांसह अगदी जिवंत आपणांसमोर उभीं राहतात. अरविंद गोखले यांची 'आजोबा' ही कथाहि त्या दृष्टीने उल्लेखनीय आहे.

या दोन्ही कथासंग्रहांत कथाविषय म्हणून ज्या ज्या व्यक्ति निवडल्या आहेत त्या समाजाच्या विविध थरांतील आहेत. त्यांत आत्मप्रौढी मिरविणारे कारकून आहेत, अभिनयाने जनतेला हसविणारे पण खाजगी जीवनांत दुःखी असे नट आहेत, खेड्यांत निष्क्रिय जीवन जगणारी अशी कारकुनाची बायको आहे, आणि जेथे दिवा जळत नाही अशा वातावरणांत वाढलेली किर्कीसारखी मुलगी आहे. जीवनांतील सर्व थरांत वावरणाऱ्या या व्यक्तींविषयी दोघांहि लेखकांना असीम सहानुभूति वाटते आणि त्यांच्या आशा, आकांक्षा व जाणिवा, सुप्त मनांतील त्यांच्या भावना चित्रित करतांना ते जणू त्यांच्या जीवनाशीं एकरूप होतात. परमनप्रवेशासिद्धी या दोघांहि लेखकांना चांगली साधली आहे. त्यामुळे त्यांच्या लघुकथांमध्ये जिवंतपणा व जिव्हाळा जाणवतो.

कथानकाचा कृत्रिम सांगाडा आजच्या लघुकथेने झुगारून दिला आहे असें विधान अनेक वेळां केलें जातें. याचा अर्थ आजच्या लघुकथेंत 'कथानक'च नसते असा केला जातो. पण हें तितकेसें खरें नाही. कारण पूर्वीच्या लघुकथांतून कथानकांत बाह्य घटनांना अधिक महत्त्व दिलें जात होतें—जोरदार बाह्य संघर्ष हे कथानकाचे विषय असत. आज लघुकथेच्या संघर्षाचें क्षेत्र बदललें आहे. मानवी मनांतील विविध भावनांचा कल्लोळ रंगविण्याचें व त्यांतील विसंगति नजरेला आणण्याचें कार्य आजचे कथालेखक करीत असल्याने वरवर लघुकथेला कथानक नाही असें वाटतें. पण मानवी मनांतील भावनांचा संघर्ष हें कथानक होऊं शकत नाही काय? 'कमळण' किंवा 'कामचक्र' यांमधील भावनांचा झगडा हा कथानकाचा विषय होऊं शकत नाही काय? फरक एवढाच की कथानक आज स्थूलाकडून सूक्ष्माकडे वळलें आहे. त्या दृष्टीने गोखल्यांच्या प्रत्येक कथेला आरंभ मध्य व अन्त आहे. सुरवात आकर्षक करण्याची ते काळजी घेतात. शेवटहि परिणामकारक करतात—पण हें सहज होतें. त्यासाठी अट्टाहास करावा लागत नाही.

अनेक वेळां एखादी भावछटा किंवा वातावरणहि लघुकथेचें कथानक म्हणून येऊं शकते. गाडगिळांची 'बिनचेहेऱ्याची संध्याकाळ' किंवा 'भीति' यांना रूढार्थाने कथानक

नाही — आणि तरीहि त्या कथा उत्कृष्ट वाटतात. तंत्राचे देव्हारे न माजवितां आजची कथा आजच्या मानवाचें यथार्थ दर्शन आपणांला घडवीत आहे याचा प्रत्यय हे कथासंग्रह वाचतांना निश्चित येतो.

आशयाबरोबर अभिव्यक्तींतहि नवेपणा आल्याचें हे कथासंग्रह वाचतांना जाणवतें. त्यांपैकी गोखल्यांच्या निवेदनपद्धतींत सरलता व परिणामकारकता आहे. तपशील कलात्मकतेने देत चित्र पूर्ण करण्याचें चित्रकाराचें कौशल्य त्यांच्या निवेदनशैलींत आहे. परिणामकारक उत्प्रेक्षांची पखरणहि त्यांच्या लेखनांत ठिकठिकाणीं दिसून येतें. 'ओल्या अडगळींत एखादी कावळ्याची छत्री उगवावी तसें टेकड्यांच्या गिचमिडाटांत पांचपंचवीस घराचं बनलेलं गांव' 'अंधार पडला तरी आंतड्याचा अजगर फुसकारत राहतो; व पहाट फुटली तरी काळजांतले कोंबडे ओरडूं लागतात' अशासारखीं वाक्यें ठिकठिकाणीं आढळतात. पण त्यांच्या शैलीची खरी परिणामकारकता आढळते ती व्यक्तींच्या वर्णनांत. केवळ व्यक्तींचें बाह्य वर्णन करूनच ते थांबत नाहीत तर थोड्याच शब्दांच्या सहाय्याने त्या त्या व्यक्तीविषयी ते वाचकांच्या मनांत असीम करुणा निर्माण करतात. 'पंडितराव' 'किकी' 'शामू' हीं सारीं व्यक्तिवर्णनें त्या दृष्टीने वाचण्यासारखीं आहेत.

त्याच्या उलट काव्यात्मकता व कल्पनाविलास हे गाडगिळांच्या शैलीचे विशेष आहेत. त्यांना तपशिलाची आवड फार—पण तो तपशील मध्यवर्ती चित्राची शोभा वृद्धिंगत करणारा असाच असतो. उपमा-उत्प्रेक्षांची पखरण जागोजाग असेल—पण त्या मूळ कथा-विषयाशीं एकजीव झालेल्या असतात. अनेक वेळां त्यांची शैली खेळकर स्वरूप धारण करते, अनेक वेळीं ती उपरोधिक, क्वचित् बोचकहि होते. मनोविश्लेषण करतांना त्यांच्या कल्पना-विलासाला विलक्षण धार चढते. 'मृत्यूचें संजीवन' यामधील एकेका व्यक्तीचें केलेलें वर्णन पहा किंवा त्या आळीचें किंवा आळींत राहणाऱ्या माणसांच्या जीवनाचें केलेलें वर्णन पहा ! त्यांतील आशयाशीं हें वर्णन किती एकजीव झालें आहे याची जाणीव वर्णन वाचतांना सहज येते. खालील वर्णन उदाहरण म्हणून पहा—

"आपल्या कल्पनाशक्तीचे पंख छाटून त्यांनी तिला व्यवहाराच्या पितळी पिंजऱ्यांत ठेवलें होतें. कौटुंबिक जीवनाच्या कूपांतच त्यांच्या भावनांचें पाणी झिरपत असे आणि तेथेच त्यांच्या अहंमन्यतेचे बेडूक डरांव करून ओरडत असत. त्यांनी आपल्या बुद्धीला पोटाकडे गहाण ठेवलें होतें आणि फाटलेल्या स्वाभिमानाला फुशारकीचीं ठिगळें जोडणें हा त्यांचा स्वभावधर्मच झाला होता."

या लहानशा उताऱ्यावरून त्यांच्या वर्णनशैलीचें वैशिष्ट्य सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

आजच्या कथेंत दोष नाहीत असें मात्र नाही. मनोविश्लेषण करण्याच्या भरांत भावनांचें इतकें सूक्ष्म पिंजण करण्याचा मोह लेखकाला होतो की त्या भरांत तें रूक्ष व अनाकलनीय होत चाललें आहे याची त्यांना जाणीवहि होत नाही. 'कामचक्र' या कथेंत थोडेसें तसें झालें आहे. तपशील देण्याच्या भरांत गाडगिळांच्या कथांत अनेकदा निष्कारण पाल्हाळ येतो–तोहि विशेष स्पृहणीय नाही.

पण हे दोष या दोन संग्रहांत तितक्या मोठ्या प्रमाणांत प्रतिबिंबित होत नाहीत. त्यामुळे 'नवकथे' ला नांवें ठेवणाऱ्यालासुद्धा आवडतील असेच या कथासंग्रहाचें स्वरूप आहे असें म्हटलें तर त्यांत फारशी अतिशयोक्ति होईल असें वाटत नाही.

—म. ना. अद्वंत.

संपादकाचें जीवनस्वप्न—( लेखक : द्वा. भ. कर्णिक, प्रकाशक : किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी ( द. सातारा ) किं. ३ रु. )

आता अगदी दूरच्या खेड्यांतील माणसालाहि वृत्तपत्राची चटक लागलेली आहे; पण तें वृत्तपत्र छापून तयार कसें होतें, याची माहिती किती जणांना असते ? ती पडद्याआडची माहिती असतेहि रूक्षच. गोंधळ, धावपळ, आरडाओरड, जागरण व खडखडाट यांचें साम्राज्य तेथे मुख्यतः असतें. ती माहिती चटकदारपणें सांगण्याचें काम श्री. कर्णिक यांनी या पुस्तकांत यशस्वीपणें पार पाडलें आहे. मुंबईतील एक दैनिक चालविण्याचा प्रत्यक्ष अनुभव त्यांना असल्याने व त्यांची वृत्ति सौहार्दाने ओथंबलेली असल्याने, त्यांनी या पुस्तकांत दिलेली माहिती बारीकसारीक तपशिलांनी भरलेली असून त्यांत कल्पनेचे विविध रंगहि उमटलेले आहेत.

या पुस्तकाचें स्वरूप एखाद्या लघुनिबंधासारखें आहे, इतिहासासारखें नाही. वार्ताहर, उपसंपादक, संपादक—या सर्वांच्या दैनंदिन जीवनांतील गमतीचे अनुभव जणु कथारूपानेच सांगितलेले आहेत. संपादकाच्या मनाचीं चक्रें कशीं फिरत असतात याचें चित्र, काचेच्या पेटींतून पहावें तसें, या पुस्तकांतून वाचकाला पहावयास सापडतें. लघुनिबंध जसा आत्मपर असतो, तसाच हा परिचयग्रंथहि आहे. त्यांत ज्या चारपांच यशस्वी किंवा वैशिष्ट्यपूर्ण संपादकांचीं शब्दचित्रें दिलीं आहेत, तीं सारीं श्री. कर्णिक यांच्या अनुभवांतील, त्यांच्या डोळ्यांपुढील अशींच आहेत. मुंबईबाहेरील एकटे श्री. माडखोलकरच त्यांना उल्लेखनीय वाटले; हें त्यांच्या आत्मनिष्ठेचेंच फळ असावें. नाही तर केळकर-जावडेकरआदि संपादकश्रेष्ठांचा विसर त्यांना कां पडावा ? या पुस्तकाच्या वाचनाने वाचकांच्या माहितींत विशेषशी नवी भर पडेल असें नाही, पण नित्याची माहितीच खुलवून-सजवून मांडली म्हणजे किती चित्ताकर्षक होते याचें प्रत्यंतर या पुस्तकांत पहावयास मिळतें.

—दा. न. शिखरे

विवेक आणि साधना—( लेखक : केदारनाथ : प्रकाशक-नवजीवन मुद्रणालय, अहमदाबाद ९. किं. ४ रु. पृ. ३८७+३६ )

'व्यवहार–शुद्धि–मंडळा 'च्या आंदोलनामुळे श्रीकेदारनाथजींचें नांव महाराष्ट्राला सुपरिचित झालेलें आहे. पण त्यांचें पूर्वजीवन, त्यांची साधना, त्यांचें तत्त्वज्ञान यांची माहिती फारशी कोणास नाही. ती जिज्ञासा या पुस्तकाने पूर्णपणें तृप्त होण्यासारखी आहे.

आप्पाजी बळवंत कुळकर्णी हें त्यांचें मूळ नांव. १९०४ सालीं गृह–त्याग करून व १५० मैल पायीं अनवाणी प्रवास करून ते साधुवेषाने सज्जनगडावर गेले. धार्मिक ग्रंथांचें वाचन व चिंतन त्यांनी केलें. उपवास, पारायण, अनुष्ठान, ध्यान इत्यादि साधनांनी एकांतांत ईश्वराची आराधना त्यांनी चालविली. हिमालयाच्या पावन गुहांचाहि आसरा त्यांनी घेतला. तेथे वैराग्याचे खरेखोटे प्रकार त्यांनी अनुभवले. मानसिक शक्ति वाढली पण ईश्वराचें साक्षात् दर्शन झालें नाही— दर्शनासारखे अनेक अनुभव मात्र आले. त्यासंबंधी नाथजी या पुस्तकांत लिहितात, " ते आपल्याच कल्पनेने निर्माण केलेले, किंचित् कालापुरते, अर्ध–जागृत अवस्थेंतील आभास आहेत असें, त्या अनुभवांना विवेकदृष्टीने सर्व बाजूंनी तपासल्यावर, मला कळून आलें. " नाथजींचें वैशिष्ट्य आहे तें हेंच ! " सर्वांना तपासणारी–पारखणारी सर्वहितकारी

विवेकदृष्टि सर्वश्रेष्ठ आहे " ही त्यांची भूमिका नानाविध धर्मपुरुषांच्या सहवासांतहि टिकून राहिली. विवेकाच्या वाटेने अध्यात्माकडे डोळसपणे जाणारे प्रांजल साधक असे नाथजी आहेत, अशी खात्री या ग्रंथांतील पानापानावर वाचकाला पटते.

विवेकशक्तीबरोबरच सामुदायिक वृत्तीचाहि पुरस्कार या ग्रंथांत नाथजींनी केलेला आहे. "ईश्वरविषयक कल्पना मनुष्यमात्राचें कल्याणच करील" अशी त्यांची श्रद्धा असली, तरी विवेकाचें त्यांचें अधिष्ठान दृढ असल्यामुळे आधुनिक चिकित्सकालाहि हें पुस्तक वाचनीय व मननीय वाटल्याविना रहाणार नाही. "वाचन मननाकरिता व मनन ज्ञानाकरता आहे आणि ज्ञानाचें पर्यवसान शेवटीं सदाचारांत झालें पाहिजे" या त्यांच्या कसोटीला उतरण्याजोगाच हा ग्रंथ आहे.

—दा. न. शिखरे

'संगीत ताई तेलीण' [ले. वि. ना कोठीवाले, प्रकाशक वा. म. नेर्लेकर, बुधवार चौक पुणें २, किंमत १॥ रु.]

"छेडलेला छावा," "सोन्याचा धूर" इत्यादि नाटकांचे कर्ते श्री. वि. ना. कोठीवाले यांनी हें तीन अंकी नाटक पेशवाईच्या अखेरच्या काळांत परशुरामपंत प्रतिनिधि, त्यांची रक्षा रमाताई तेलिण व पेशव्यांचा सेनापति बापू गोखले यांच्या वासोटा किल्याबाबत व त्याच्या आसमंतांत जो दोन तीन वर्षें सामना चाललेला होता, त्या ऐतिहासिक भूमिकेवर १९४२ सालींच लिहिलें. त्याचे प्रयोग नाटकमंडळ्यांनी आजपर्यंत केल्यावर १९५३ सालीं नाटकांतील प्रसंगांच्या फोटोसह तें छापण्याचा योग आला. ही सर्व हकीगत देऊन नाटक 'नवीन संशोधन-पर ऐतिहासिक वाङ्मयात्मक' कसें आहे, तें दाखविण्याचा प्रयत्न लेखकाने (तेल्याच्या घाण्यांत) प्रस्तावनेंत विस्तृततेने केला आहे! त्यांत अहंकाराचा बराच वास येतो.

पंतप्रतिनिधींचा नादानपणा, व्यसनाधीनता, त्यांचा ताई तेलिणीशीं असलेला संबंध, त्यांच्या पेशव्यांच्या बरोबर चाललेल्या कटकटी,बापू गोखल्याने वासोटा किल्ल्यावर केलेली स्वारी बापूंचा मुलगा व सून यांचा तेजस्वी शेवट वगैरे कांही ऐतिहासिक घटना व कांही लिंगो भगवान या सारखीं काल्पनिक पात्रें यांच्या मदतीने या नाटकाची उभारणी केली आहे. पेशवाईच्या अखेरच्या काळांत महाराष्ट्राची परिस्थिति किती वाईट होती, फंदफितुरी कशी माजली होती, स्वार्थसाधुपणा व देशद्रोह कसा बोकाळला होता, व अशा आणिबाणीच्या प्रसंगींहि बापू गोखल्यांसारखे कांही अपवादात्मक हिरे कसे चमकत होते, परंतु त्याचा कसा उपयोग होण्या-सारखा नव्हता, हें प्रस्तुत नाटकावरून कळून येईल.

नाटकांतील संवादामुळे नाटकप्रयोगाचे वेळीं काय विनोद निर्माण होत असेल तो असो परंतु लिंगो भगवान याची घेडगुजरी कानडी-इंग्रजी-मराठी भाषा, स्मिथचें (पृ. १६) 'वेलप्रसंगीं किसलींग फंड फिटुरी करावी लागेल,' हें वाक्य, पृष्ठे ७१।७२ वरील स्मिथ व ताई तेलीण यांच्यांत दाखविलेली शिवीगाळ, ताईचा नवरा गांगड्या याच्या तोंडीं कांही कांही वेळां घातलेली जड भाषा, कल्याण-कात्यायन, हुजत-इज्जत, हुंगेगिरी हेरगिरी, कारभारी-केरभरी इत्यादि शब्दांची कसरत या गोष्टी कशाशाच वाटतात.

—न. का. घारपुरे.

'संगीत मायमाउली' [ले. ला. कृ. आयरे, वसुंधरा प्रकाशन मुंबई, किंमत १॥ रु.]

श्री. आयरे यांचें हें स्वतंत्र सामाजिक संगीत चार अंकी नाटक आहे. रंगरावासारख्या दुष्ट, व्यसनी, भित्र्या व पाताळयंत्री माणसाच्या सर्वस्वीं आहारीं गेलेला नानाराव आपल्या

विधवा भावजयीचा (जयवंती) व पुतण्याचा (सगुण) अनन्वित छळ करतो व शेवटीं त्यांना घराबाहेर काढतो. तीं दोघें मुंबईची वाट धरतात. तेथे जयवंती मोलमजुरी करून सगुणचा विद्याभ्यास करीत असते. नानाराव स्वतःच्या नूतन सुविद्य पत्नीचाहि (अंजनी) रंगरावाच्या सांगण्यावरून छळ करतो. तीहि मुंबईस जयवंतीकडे येऊन राहते. त्याच गांवचा पण आता मुंबईत राहणारा उमदा व परोपकारी युवक अरविंद हा जयवंतीला शक्य ती मदत करीत असतो, तर तेथलाच दुसरा मूर्ख तरुण श्याम हा मुंबईत 'अफाट पिक्चर्स' मध्ये नोकरीस असून, बिजली ही सिनेमास्टार आपल्यावर फिदा आहे अशी स्वतःची खुळी फसवणूक करून घेत असतो. नानाराव व रंगराव ही जोडी जयवंतीला छळण्याकरिता व अंजनीला मुंबईहून परत नेण्याकरिता मुंबईस येते. तेथे रंगराव बरेच डावपेंच खेळतो, परंतु त्याला यश येत नाही. अरविंदाच्या चतुराईने व कर्तबगारीने शेवटीं नानारावाचे डोळे उघडतात व त्याला पश्चात्ताप होतो. सगुण हा डॉक्टरीची परीक्षा उत्तीर्ण होतो व खेड्यांचा उध्दार करण्यासाठी तो आपल्या गावीं जातो व तेथे जनसेवा करतो. जयवंती सर्वांनाच आश्रय देते व म्हणून "सर्वांनी माय-माउली म्हणून तिच्यापुढे मस्तक नमवावं", हें अरविंदाने तिचें गाइलेलें महत्व खरें ठरतें.

खेडेगावांतील लोकांना शिक्षण मिळणें जरूर आहे. म्हणून सगुणसारखे जे लोक शहरांत शिक्षण घेतात, त्यांनी परत खेडेगावांत जाऊन आपल्या बांधवांना सुशिक्षित केलें पाहिजे हा संदेश नाटककाराला द्यावयाचा आहे. तसेंच सिनेमाचा धंदा हें मृगजल असून, नानारावांसारख्यांपासून लोकांनी दूर असावें, असाहि इषारा द्यावयाचा आहे.

नाटकांतील प्रसंग बरे साधले असून भाषाहि ओघवती आहे. श्यामच्या सिनेमा कंपनी, बिजली, वगैरे बाबतच्या आचरट भाषणांव्यतिरिक्त विनोदाला फारसा वाव नाही. विषयहि गंभीर आहे. श्री. आयरे यांनी तो बरा हाताळला आहे. — न. का. वारपुरे.

पद्न्यास—एकांकिका-संग्रह, (संपादक :- अ. म. जोशी, ना. बा. गोडबोले, व कु. चंपावती केतकर, प्रकाशक :—शारदोपासक मंडळ, ग्वाल्हेर; किंमत २॥ रु.)

ग्वाल्हेर येथील शारदोपासक मंडळाने १९५१ मध्ये "पदन्यास" हें तिसरें पुस्तक प्रकाशित केलें. यांतील अकरा एकांकिकांपैकी तीन अनुवादित असून, बाकीच्या मध्यभारतां-तील निरनिराळ्या लेखकांनी लिहिलेल्या आहेत.

"पदन्यास करण्यापूर्वी" या आपल्या प्रस्तावनेंत कु. चंपावती केतकर यांनी एकांकिका ह्या वाङ्मयप्रकाराचा धावता इतिहास देऊन तो मराठींत कसा आला तें सांगितलें आहे. प्रयोगास आरंभ झाल्यापासून शेवट होईपर्यंत पडदा पडत नसल्यामुळे या प्रकारास एकांकिका हें सुटसुटीत व सोपें नांव प्राप्त झालें. यानंतर एकांकिका व नाटक यांचा परस्पर-संबंध दाखवून नाटकास लागू पडणाऱ्या, विषयाची योग्य निवड, संविधानकाची कुशल रचना, उत्तम नट, सुसज्ज रंगभूमि, रसिक प्रेक्षकवर्ग, मार्मिक व खटकेबाज संवाद, तीनहि ऐक्यांचें पालन, परिणामकारक पात्र–स्वभाव–लेखन, वगैरे गोष्टी सामान्यपणें एकांकिकेलाहि कशा आवश्यक आहेत, तें सांगितलें आहे. याशिवाय एकांकिकेच्या तंत्राचाहि विचार केला आहे. सध्याच्या धावपळीच्या जीवनांत, थोडक्या वेळांत व थोडक्याच पैशांत भरपूर करमणूक

करणाऱ्या सिनेमासृष्टीशीं स्पर्धा करण्यास एकांकिकाच समर्थ आहेत, असा लेखिकेने शेवटीं स्वतःचा अभिप्रायहि दिला आहे. ही संपूर्ण प्रस्तावना माहितीपूर्ण, उद्बोधक व अभ्यासोपयोगी आहे.

(१) दत्तात्रेय बोरगांवकर यांची "शरणार्थी" ही एकांकिका भारत खंडित झाला त्यामुळे प्राप्त झालेल्या परिस्थितीवर आधारलेली आहे. 'दुःखमय भूतकालाबद्दल शापवाणी की सुखमय भविष्यासाठीं प्रार्थना' ह्या प्रश्नाचें उत्तर 'दुःखमय भूतकाल विसरून, सुखमय भविष्यासाठी खटपट करणें' यांत साठविलेलें आहे. (२) सौ. शांताबाई वाकणकर यांची "परिस्थितीप्रमाणे परिवर्तन" ही मूळ रशियन एकांकिकेच्या इंग्रजी भाषांतरावरून अनुवादित केलेली एकांकिका आहे. कर्तव्य किंवा दया यामुळे केल्या जाणाऱ्या प्रेमाचा फोलपणा, जीवन सुखमय करण्याचा प्रत्येकाचा हक्क व आशावाद, या गोष्टी झटपट संवादांतून टुमदार रीतीने स्पष्ट मांडल्या आहेत. (३) "दारावर थाप" ही श्री. उमाशंकर जोशी यांची मूळ गुजराथी एकांकिका श्री. अ. म. जोशी यांनी अनुवादित केलेली असून, गरीब स्थितींतहि पाहुण्यांच्या केलेल्या आदरातिथ्यामुळे एका कुटुंबाची कशी कुचंबणा होते व नंदु गोराणी-सारख्या सात्विक स्त्रीच्या मनाचा कसा कोंडमारा होतो, हें दृश्य चांगल्या भाषेंत मांडलें आहे. (४) श्री. चंद्रकांत ओदक यांची "आम्हांला जगायचं आहे" ह्या एकांकिकेंतील अद्भुतरम्य कथानक, त्याचा विस्मयकारक शेवट, दरोडेखोर व पोकळ जहागीरदार यांच्या जीवनांतील दाखविलेले साम्य-भेद इत्यादि वाचनीय आहेत. (५) श्री. ना. बा. पराडकर यांच्या "तृषा" या एकांकिकेंत कालैकता, स्थानैकता व कार्यैकता हीं चांगली पाळली गेलीं आहेत. दुर्जनसिंग व सज्जनसिंग यांच्या विरोधी स्वभावांतील संघर्ष व दुर्जनांचा नाश त्यांच्याच कृत्यांनी कसा होतो, तें दाखविलें आहे. (६) श्री. सुशीला बोरगांवकर यांच्या "एकच स्फोट" ह्या एकांकिकेंत बाबासाहेब या शास्त्रज्ञाची तन्मयता, निर्भयता, चिकाटी व स्वतःच्या शोधामुळे स्वतःचाच अंत होत असतांना तो शोध टिकविण्यासाठी त्यांना लागलेली तळमळ वगैरे गोष्टी चांगल्या रीतीने चित्रित झाल्या आहेत. (७) श्री. द. वि. पंडित यांनी "अहो, आपण एका जातीचे"! ह्या एकांकिकेंत डॉक्टर व वॉचमेकर यांच्यांतील खटकेबाज व चटकदार संवादाच्या साहाय्याने 'जग हें धंद्यावर चाललं आहे नुसतं' हें मर्म स्पष्ट केलें आहे. (८) "गर्वाचं घर" या तीन प्रवेशात्मक एकांकिकेंत ! श्री. शं. गो. वाळिंबे यांनी भुताटकी, कम्युनिझम्, घरमालक-भाडेकरू-तेढ वगैरे अनेक विषय व अनेक पात्रें आणलीं आहेत. (९) श्री. गो. स. दातार यांनी "चारुमित्रा" या हिंदीवरून अनुवादित केलेल्या दीर्घ एकांकिकेंत चारुमित्रेसारख्या सेविकेच्या आत्मबलिदानयुक्त निष्ठेमुळे सम्राट् अशोक अहिंसावादी कसा झाला, हें प्रौढ भाषेंत सांगितलें आहे. (१०) वामनाग्रज यांनी "ध्येयनिष्ठा" ह्या एकांकिकेंत 'साध्या इतकेंच महत्व साधनांचें आहे काय' या प्रश्नाचा ऊहापोह मार्मिकपणें केला आहे. (११) राम जोगळेकर यांच्या "थोरले साहेब" ह्या एकांकिकेचें कथानक 'अंमलदार' यांतील कथानकासारखेंच असून, पोलीस कचेरींतील लांचलुचपतपणाने बरबटलेल्या व्यवस्थेची अवस्था कथन केली आहे.

पुस्तकाच्या शेवटीं लेखकांचा परिचय थोडक्यांत दिला आहे. हा एकांकिका-संग्रह प्रकाशित करून, मराठी वाङ्मयांतील ह्या नवीन दालनांत "पदन्यास" केल्याबद्दल ग्वाल्हेर येथील शारदोपासक मंडळाचें अभिनंदन करणें युक्तच ठरेल.

—न. का. घारपुरे.

## मराठीचिये नगरीं :

संपादक

### अहमदाबाद साहित्यसंमेलन

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें ३६ वें अधिवेशन अहमदाबाद येथे ऑक्टोबर महिन्यांत पार पडलें. श्री. विठ्ठलराव घाटे यांनी अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. आपल्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनी अनेक विषयांचा ऊहापोह केला त्यांतील विशेष महत्त्वाचा भाग शुद्धलेखना-संबंधी आहे असें मला वाटतें. श्री. घाटे यांच्यासारख्या शिक्षणशास्त्रज्ञाने अनुच्चारित अनुस्वारांविषयीं व्यक्त केलेल्या मताचें सर्वांनी नीट मनन करावें अशी मी विनंती करतों. ते म्हणतात :

" शुद्धलेखनाचा विचार करतांना मराठी भाषा ही तीन कोटी लोकांची आहे, तीन कोटी लोक ती लिहिणार आहेत हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. सत्तर ऐंशी टक्के मराठी बोलणारे व लिहिणारे प्राथमिक शिक्षणापुढे मजल मारीत नाहींत हेंहि आपण विसरूं नये. मराठी ही नुसत्या पंडितांची भाषा राहिली नाही. पंडितांना जें सोपें असेल तें विनाकारण अवघड करून ठेवण्याची वाईट खोड असते. गेल्या शतकांत या पंडितांच्या तावडींत मराठी शुद्धलेखन गेल्यामुळे त्यांनी द्राविडी प्राणायामाची आपली हौस भरपूर पुरवून घेतली. या पंडिती शुद्धलेखनापासून मराठीला वांचवलें पाहिजे. तुम्ही - आम्ही मराठी शब्द बोलतों, वाचतों, लिहितों. या शब्दांची कुळकथा आपल्याला माहित असते का? ती माहीत नाही म्हणून आपलें कधी आडलें आहे काय? तुमच्या-माझ्यासारख्या सामान्य माणसाची गोष्ट सोडून द्या. आपल्या थोर कवींना, निबंधकारांना, वक्त्यांना ते वापरीत असलेल्या कितीशा शब्दांची व्युत्पत्ति माहित असते? त्यांचें काम सुरळीत चाललें आहे. आजोबा गुडघ्याइतका पंचा नेसत होते याची हमेशा आठवण राहण्यासाठी तुम्ही आजच्या लहंगेवाल्या पोरांना पंचे नेसवणार का? ऐकतील का तीं पोरें तुमचें? व्युत्पत्ति हें एक मनोरंजक व उद्बोधक शास्त्र आहे. त्याचा कॉलेजांत अवश्य अभ्यास करा. रिकामा वेळ असेल, हौस असेल तर एकाद्या शब्दाची कुळकथा तपासण्यासाठी व्युत्पत्ति-कोश अवश्य उघडा, पण व्युत्पत्ति शुद्धलेखनाच्या बोकांडीं बसवूं नका.

लेखन उच्चारानुसारी पाहिजे व ते उच्चार अधिकृत व शिष्टसंमत असले पाहिजेत. कोकणांतील लोकांना कायमचें पडसें झालेलें असतें. त्यांच्या या आनुनासिक विकृतीला प्रकृति समजूं नका. लेखनाचे मुख्य हेतु दोन. साधारण शिकलेल्या माणसाला सहज लिहितां आलें पाहिजे व सहज वाचतां आलें पाहिजे......शुद्धलेखनाचे नियम मुख्यत: लेखन व वाचन सोपें जावें याचसाठी असावेत. "

शुद्धलेखनाचा फेरविचार करण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाने एक स्वतंत्र समिती नेमलेली आहे. तिच्याकडून या प्रश्नाचा योग्य तो निर्णय लावून घेण्यांत श्री. घाटे यांनी यश मिळविलें तरी त्यांची कारकीर्द आमच्या दृष्टीने संस्मरणीय होईल. तरी या महत्त्वाच्या प्रश्नाकडे त्यांनी अवश्य लक्ष घालावें अशी आम्ही त्यांना प्रकट विनंती करतों.

## डॉ. तुळपुळे आणि संतकाव्याची फलश्रुति

या संमेलन प्रसंगीं एक स्वतंत्र शाखासंमेलन भरवून तेथे संतवाङ्मयाची चर्चा झाली. अध्यक्षस्थानीं डॉ. शं. गो. तुळपुळे यांची योजना झालेली होती. संतांच्या कार्याचें अलीकडे सामाजिक दृष्टिकोनांतून समीक्षण केलें जातें. तें डॉ. तुळपुळे यांना बरोबर वाटत नाही. त्यांच्या मतें संतांचें मुख्य कार्य सामाजिक नाही तर आध्यात्मिक आहे. "...वरील साधनेची परिणति ज्यांत होतें तें साध्य म्हणजे आत्मसाक्षात्कार किंवा आत्मज्ञान. ही संतजीवनाची व संतकाव्याची खरी फलश्रुति होय." असें ते म्हणतात. "आधुनिक अभ्यासक स्वकालीन कल्पनांचा चष्मा डोळ्यांवर चढवून गतकाळांतील घटनांची परीक्षा करूं पाहतात व त्यामुळे त्यांचें विवेचन सहजच एकांगी होऊन बसतें. पुरोगामित्व, प्रतिगामित्व, समता, वर्गभेद इत्यादि नवकल्पना आमच्या संतमंडळीस परिचित होत्या असें वाटत नाही. त्यांची भूमिका अगदी निराळी होती. ते संत होते व त्यांची समीक्षा संत म्हणूनच व्हावयास हवी." असा डॉ. तुळपुळे यांचा आग्रह आहे. असें असूनहि "महाराष्ट्रांतील संतांच्या हातून फार मोठें सामाजिक कार्य झालें यांत शंकाच नाही." असे ते मान्य करतात. मग 'संतांच्या हातून जें फार मोठें सामाजिक कार्य झालें" त्याचें मूल्यमापन आधुनिक चिकित्सकांनी केलें तर बिघडलें कोठे ! आमचे संत समाजपराङ्मुख होते असे डॉ. तुळपुळे मानतात हीच मोठी चूक होय. कांही वचनांच्या आधाराने त्यांनी संतांची आध्यात्मिक विचारसरणी मांडली हें खरें; पण इतर टीकाकार संतांची सामाजिक विचारसरणी पुढे मांडतात ती आधाराशिवाय तर नाही ना ! आत्मसाक्षात्काराबरोबरच संतांना दुसरेंहि कांही साध्य असूं शकते हें आमच्या या 'आत्मसाक्षात्कारी' टीकाकारांनी अवश्य लक्षांत घ्यावें.

## मराठी वाङ्मय परिषद्, बडोदें.

ता. १९ नोव्हेंबर १९५३ रोजीं बडोदें येथे मराठी वाङ्मय परिषदेचें अधिवेशन भरलें, त्यावेळीं तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी अध्यक्ष या नात्याने अत्यंत विचारपरिप्लुत भाषण केलें. "वास्तव आणि सत्य हेंच कलेचें अंतिम लक्ष्य असल्यामुळे शास्त्र आणि काव्य हे दोन्ही वाङ्मयप्रकार कलात्मकच मानले पाहिजेत. वास्तवाला आणि सत्याला आत्मवश करणें हेंच कलेचें साफल्य आहे. माणसाचें असामर्थ्य आणि क्लैब्य हरण करणें, त्याची दृष्टि विश्वाच्या परिघाला वळसा घालील इतकी क्रांतिदर्शी करणें, हेंच कलेचें स्वरूप आहे. शास्त्र आणि काव्य यांची जे फारकत करतात ते वाङ्मयांतील सत्याचा, विवेकाचा प्रकाशच नष्ट करीत असतात, हें त्यांस कळत नाही. वास्तवानुसारी व ज्ञानाच्या पार्श्वभूमीवर पोसलेला समग्र अनुभव जर साहित्याचें सार नसेल तर आंधळ्या भावनांचा आणि उन्मत्त वासनांचा तो नाच होय असें म्हणावें लागेल. असें वाङ्मय मानवाला दीर्घ अंधतमांत नेऊन सोडील. याकरिता साहित्य-समीक्षक व टीकाकार यांनी आपली एकांगी टीकाशास्त्रें व मागासलेलीं साहित्यशास्त्रें सुधारून घ्यावींत. कमी पल्ल्याचीं तोटकीं हत्यारें पराभवाचीं साधनें बनतात, तशीं हीं साहित्यशास्त्रें व टीकाशास्त्रें बनत आहेत." असे आपल्या विवेचनाचें सार तर्कतीर्थांनी स्वतःच सांगितलेलें आहे.

## मध्यभारत मराठी साहित्यसंमेलन

मध्यभारत मराठी साहित्य संमेलनाचें सहावें अधिवेशन ग्वाल्हेर येथे आचार्य प्र. के. अत्रे यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ११ नोव्हेंबर १९५३ रोजीं साजरें झालें. मराठींतील अक्षर वाङ्मयासंबंधी बोलतांना आचार्य म्हणाले : "मराठींत लिहिल्या जाणाऱ्या नवकथा किंवा लिहिलीं जाणारीं नवकाव्यें उच्च साहित्याच्या कसोटीला उतरूं शकत नाहीत. केवळ वाचकांचें मनोरंजन करण्यासाठीं खालच्या दर्जाला जाऊन अश्लील गोष्टी आकर्षक करणें हाच या साहित्यामागील हेतु; परंतु यामुळे मानव प्रगत होण्याऐवजी अधोगतीला जाईल. तेव्हा अशा लिखाणाला वाङ्मय किंवा साहित्यदेखील म्हणतां येणार नाही. हें लिखाण कोळ्याच्या जाळ्यासारखें फसवें असतें. याच्या उलट खरें साहित्य मधाच्या पोळ्यासारखें असतें. त्यांत जीवनाचे मधुघट भरलेले असतात. ज्या गीतेने आपल्याला 'आत्मवत् सर्वभूतेषु' अशी शिकवण दिली ती गीता म्हणजे साहित्याचा सर्वश्रेष्ठ प्रकार होय. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास यांसारख्या संतांनी अक्षरसाहित्य निर्माण केलें आहे. जें साहित्य मानवतेच्या कल्याणासाठी लिहिलें जातें आणि ज्यांत जीवनाचें खरें आणि स्वच्छ प्रतिबिंब पडलेलें दिसतें तेंच खरें अक्षरवाङ्मय होय."

## गोविंदाग्रज आणि तांबे

गेल्या महिन्यांत इंदूर येथील महाराष्ट्र साहित्य सभेने वार्षिक शारदोत्सव साजरा केला. श्री. वि. द. घाटे यांनी अध्यक्षपदावरून भाषण करितांना आपल्या इंदूरच्या आठवणी अत्यंत रसाळपणाने सांगितल्या. कविवर्य तांबे यांच्या आठवणी सांगतांना ते म्हणाले : "त्या वेळच्या प्रख्यात कवींच्या कविता मी त्यांना ( तांब्यांना ) म्हणून दाखवीत असें. पण तांब्यांचें समाधान क्वचितच होई. 'राजहंस माझा निजला' ही कविता प्रसिद्ध झाल्यावर मीं त्यांना म्हणून दाखविली. इतर मंडळी कविता ऐकतांना रडली. तांबे शांतपणें मला म्हणाले, "घाटे, ही कविता म्हणजे Conceits चें कोडबोळें आहे; कल्पनांची माडी रचली आहे. हें खरें काव्य नाही. अशाच प्रसंगावरची तुमच्या वडिलांची 'बा, नीज गडे, नीज गडे लडिवाळा' ही खरी कविता. तिच्यांत आईचें खरें हृदय आहे. राजहंसांत आई बोलत नाही, गोविंदाग्रज बोलतात." Intellectual Conceits हें तांब्यांच्या हातांतलें नेहमीचें अस्त्र असें. या अस्त्राने ते चांगल्या चांगल्या कवींना गारद करीत. शब्दांचें अवडंबर व कल्पनांची कसरत तांब्यांना बिलकुल आवडत नसे. अशा कविता त्यांना वाचून किंवा म्हणून दाखविल्या की, ताडकन् ते एखादी इंग्रजी कविता किंवा शाकुंतल–उत्तररामचरित्रांतील एखादा श्लोक आवेशाने म्हणून दाखवीत आणि म्हणत "बघा, खरें काव्य कसें असतें तें!"

गोविंदाग्रजांविषयी असें मत असलेल्या तांब्यांची 'मरणांत खरोखर जग जगतें' ही ओजस्वी कविता श्री. पु. रा. लेले यांनी गडकऱ्यांच्या नांवावर घातली आहे हा केवढा दैवदुर्विलास! विद्यार्थ्यांसाठी लिहिलेल्या 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें' या आपल्या पुस्तकाच्या शेवटीं श्री. लेले लिहितात : "राणी लक्ष्मीबाई आणि तात्या टोपे ह्यांच्या मृत्युमुळेच गोविंदाग्रजांस 'मरणांत खरोखर जग जगतें' ही कविता 'प्रसवण्याची' स्फूर्ति झाली." हीं वाक्यें ऐकून गोविंदाग्रज आणि तांबे यांच्या आत्म्यास काय वाटेल याची कल्पनाच करावी!

## विदर्भ साहित्य संमेलन

विदर्भ साहित्य संमेलनाचें सोळावें अधिवेशन खामगांव येथे ता. २५, २६ व २७ रोजीं अत्यंत उत्साहाने पार पडलें. संघाध्यक्ष प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित हेच संमेलनाध्यक्ष होते. कार्यक्रमाच्या आखणींत करमणुकीपेक्षा 'साहित्या' वर विशेष भर दिला होता हें या संमेलनाचें वैशिष्टय होय. मराठी नाट्य, मराठी काव्य व मराठी गद्य या तीन विषयांवर अनुक्रमें श्री. मामा वरेरकर, श्री. ना. घ. देशपांडे व श्री. वि. भि. कोलते यांचीं व्याख्यानें ठेवून संपूर्ण मराठी वाङ्मयाचा आराखडा श्रोत्यांसमोर मांडण्याचा चालकांचा उद्देश स्पृहणीय होता. प्रा. पंडित यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत भाषावार प्रांतरचनेचें महत्त्व वर्णन करून विदर्भातील गेल्या वर्षांच्या साहित्याचें थोडक्यांत समालोचन केलें. अनुषंगाने संपूर्ण महाराष्ट्रांतील साहित्याचा विचार करतांना त्यांनी निर्देशिलेल्या उणीवा चिन्त्य आहेत. ते म्हणाले :

" महाराष्ट्रांतील एकंदर साहित्याचा विचार करतांना एक मोठी उणीव नजरेंत भरते. ती ही की, मराठींत जसें ललितवाङ्मय उदंड आहे तसें विज्ञानवाङ्मय नाही. आजचें जग हें विज्ञानाचें आहे. तेव्हा त्या प्रकारचें वाङ्मय विपुल प्रमाणांत प्रसिद्ध होऊन समाजांत त्याचा प्रसार होणें आवश्यक आहे. दुसरी एक उणीव सहज दृष्टोत्पत्तीस येते ती ही की, आज जें ललितवाङ्मय प्रसिद्धी पावत आहे, त्यांत लघुकथा व कविता यांचाच बेसुमार भरणा आहे. नाटक व कादंबरी हे प्रौढ प्रकार जवळजवळ नाहीसेच झाले आहेत. लघुनिबंधाची तीच स्थिति आहे. प्रबंधाच्या व निबंधाच्या स्वरूपाचें वैचारिक गद्य कांही एका विवक्षित प्रमाणांत निर्माण झालें आहे. वस्तुतः त्याची गरज अधिक आहे. दिवाळीच्या सुमारास आमच्या नियतकालिकांना भलतेंच उधाण येत असतें. परंतु त्यांत कथा, कविता, रहस्यमय कादंबऱ्या आणि विनोदी चुटके यांचाच मोठ्या प्रमाणांत भर असतो. पुन्हा या कथाकादंबऱ्यांचा मुख्य विषय स्त्रीपुरुष-प्रेम हाच असतो. त्यांतहि ज्यामुळे लिप्सा व जुगुप्सा उत्पन्न होईल अशा मानवी मनांतील पाशवी, हिडीस व ओंगळ अंगाचेंच बीभत्स चित्रण असतें. कांही नियतकालिकें तर केवळ वाचकांच्या लंपट वृत्तीस जागृत करण्यासाठीच अवतीर्ण झालीं आहेत. त्यांनी वेळेवारीच स्वतःची जबाबदारी ओळखणें आवश्यक आहे; किंवा वाचकांनी तरी त्यांना पायबंद घातला पाहिजे. "

प्रा. पंडितांनी दाखविलेल्या उणीवांचा आमच्या लेखकांनी, नियतकालिकांनी व वाचकांनी विचार करणें अत्यंत आवश्यक आहे.

## मामा वरेरकरांचे 'दिल्लीवर मोर्चे'

मामा वरेरकरांचें पहिलें नाटक 'कुंजविहारी' खामगावला रंगभूमीवर आलें. या दृष्टीने खामगावच्या अधिवेशनांत नाट्यसृष्टीचा आढावा घेण्यासाठी त्यांची योजना करण्यांत संमेलनाच्या संचालकांनी अभिनंदनीय योजकता व्यक्त केली यांत शंका नाही. मराठी साहित्याचा डिंडिम भारतभर गाजला पाहिजे ही मामांची अलीकडची तळमळ आहे. तीच त्यांनी आपल्या भाषणाच्या शेवटीं पोटतिडकेने बोलून दाखविली आहे. ते म्हणालेः—

" दिल्लीच्या राजधानींत आज मराठीला स्थान नाही. साहित्य आणि कला यांचा ज्या ज्या वेळीं प्रश्न येतो, त्या त्या वेळीं दिल्लीच्या राजधानींत बंगालला हांक घातली जाते. बंगाली साहित्यिकांनी आणि कलावंतांनी पुस्तकनिर्मिति, नाट्यनिर्मिति, नृत्य आणि संगीत या

सर्व बाबतींत कांहीतरी करून दाखवलें आहे. हें जरी खरें असलें तरी या सर्व क्षेत्रांत महाराष्ट्र खास मागे नाही. बंगालने केवळ बंगाली भाषेपुरतें पाहिलें आहे. इतर भाषांकडे कटाक्षाने दुर्लक्ष केलें आहे. महाराष्ट्राचें तसें नाही. विशेषतः हिंदी भाषेचा प्रसार करण्याच्या पायीं महाराष्ट्राने जी कामगिरी केली आहे तिला भारतांत तोड नाही. असें असतांहि मराठी भाषिकांची आणि महाराष्ट्राच्या कलेची आणि साहित्याची जाणीव दिल्लीला आली नाही ती महाराष्ट्रीयांच्या प्रसिद्धिपराङ्मुखतेमुळे. हा आत्मघातकी विनय आणि शालीन्याचा अभिमान टाकून महाराष्ट्राने दिल्लीवर मोर्चे लावले पाहिजेत.

राजकारणापेक्षा देखील भाषाकारण फार प्रभावी आहे. आज इंग्रज निघून गेले तरी त्यांनी आपल्या भाषेच्या जोरावर भारतावर जी पकड धरून ठेवली आहे ती भविष्यकाळांत लौकर सुटेलशी दिसत नाही. इंग्रजांचें राजकारण गेलें, पण इंग्रजांच्या वाङ्मयाची आणि इंग्रजी रंगभूमीची राजवट अजूनहि पूर्वीच्या इतकीच बलशाली होऊन राहिली आहे. इंग्रजी भाषेच्या आणि कलेच्या या इतिहासापासूनच मराठी भाषिकांनी धडा घेतला पाहिजे. मराठी साहित्य, मराठी संगीत आणि मराठी कला या तिहींचेंहि महत्त्व दिल्लीला पटवून देण्यासाठी मराठी नाटककारांनी लिहिलेलीं, मराठी लेखकांनी अनुवादित केलेलीं, मराठी दिग्दर्शकांनी दिग्दर्शित केलेलीं आणि मराठी नटनटींनी अभिनीत केलेलीं हिंदी नाटकें दिल्लीच्या रंगभूमी-वर प्रयोगित झालीं तर साहित्याच्या आणि कलेच्या क्षेत्रांत महाराष्ट्राचा दर्जा काय आहे याची यथार्थ कल्पना दिल्लीश्वरांना येऊं लागेल. आजच्या महाराष्ट्राला, साहित्यिक आणि कलाप्रवण महाराष्ट्राला, आजच्या काळाचा हाच संदेश आहे. "चलो दिल्ली !"

## जानपदगीतें लिहिणारांना विनंती

खामगाव येथील संमेलनांत 'मराठी काव्या' वर बोलतांना प्रसिद्ध कवि श्री. ना. घ. देशपांडे यांनी जानपदगीतें लिहिणाऱ्या कवींना केलेली विनंती विचारणीय वाटेल. श्री. देशपांडे म्हणालेः—

"मराठी भाषा एकच आहे यांत शंका नाही. पण महाराष्ट्राच्या लागून असे दुसऱ्या भाषिकांचे प्रदेश आहेत व सीमेजवळच्या संधिप्रदेशांत दुसऱ्या भाषेच्या सहवासामुळे मराठीं-तील पोटभेदाच्या बोली महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत. महाराष्ट्रांतील कांही प्रदेश असे आहेत की ज्यांना आतापर्यंत नवीन संस्कार कोणतेच झालेले नाहीत व तेथली मराठी अगदी जुन्या काळांत जशी होती तशीच आजहि आहे. त्यामुळे झालेले दुसऱ्या प्रकारचे पोटभेद आहेत. अशा तऱ्हेच्या अनेक स्थानिक बोली महाराष्ट्रांत आज आहेत. त्याचें वैविध्य फार सुंदर आहे. वऱ्हाडांतील आमच्या घाटांवर देखील कांही बोली फार वेधक व सुंदर आहेत. तुम्हांला कांही नमुने सांगतों—एक प्रौढ स्त्री म्हणते 'या पोरीले काहीबी समजत नाही. बोलावऽ कसऽ, चालावऽ कसऽ, राजसवाणी हासाव कसं काही बी समजत नाही.'

मुलगी म्हणते, 'तुले वऽ काय करायच मावशी ? दूं मोठी चांगली हे त मालुम हे.'
प्रौढा म्हणते, 'आय् हाय्, लईच बोलती लगे, येइनान् जाइनान् नाव ठेवलं मैना.'
त्याचप्रमाणे देऊळगांवराजाकडच्या बोलीचा हा नमुना पहा :

'वासुदेवानं सगळ्याला इळुइळु वाटून देल.'
'खायन गोळा, मग त गोळा गोळा कराती !'

वरील बोलींचा अभ्यास करून व त्या त्या प्रदेशांतील चालीरीतींचा अभ्यास करून मगच जानपदगीतें लिहिणाऱ्या कवींनी त्याप्रमाणे रचना करावी अशी माझी विनंती आहे. मराठींतील जानपद गीतांतील भाषा सगळीकडची एकच दिसते व विषयहि सारखाच वाटतो याचें कारण शहरांतील कवीच तीं गीतें लिहितात व कांहीच न पाहतां नागर कथांनाच वाकड्या तिकड्या शब्दांची जोड देऊन रचना करतात व कधी कधी मुद्दामच भाषा दुर्बोध करतात. मध्यंतरीं जानपद गीतांची जंगी लाट मराठी कवितेंत उठली होती. ग. ल. ठोकळांनी त्यावेळी 'सुगी' नांवाचा एक तशा गीतांचा संग्रहहि प्रसिद्ध केला होता. पण त्यानंतर ही लाट ओसरली असें दिसत आहे. जनपदांतील सुंदरतेचा, वैविध्याचा व अद्‌भुतरम्यतेचा परामर्श मराठी कवितेने अद्याप घ्यावा तसा घेतलेला नाही. तरी देखील कांही खरी जानपद गीतें कशीं सुंदर असतात याचा एक नमुना म्हणून वैदर्भीय कवि पांडुरंग श्रावण गोरे यांच्या 'पाटलाची पोर' या कवितेंतील या सुंदर ओळी पहा:

'रत्नटीक साडी लाल शालजोडी जडित शिणगार
झलमाची गाडी बसून भूल पाडी आंत सुकुमार
बाभुळबन दाट डोंगराळ वाट रान चौफेर
गोऱ्हे अरकाट सुटले सरनाट नवे दमदार !
पिवळी नख बोटी नाजुक शेलाटी पोर गुलजार
रत्नाची वाटी सोन्याच्या ताटीं कुण्या पडणार ?'

या कवितेंत प्रादेशिक बोली व चालीरीति यांचें किती सुंदर प्रतिबिंब पडलेलें आहे ! वऱ्हाडांतील बाभुळवनांत व घाटाच्या डोंगराळ वाटेंत कोणती सुंदर भाषा आहे व तेथल्या चालीरीति किती मोहक आहेत याचें यापेक्षा जास्त हृदयंगम वर्णन आणखी कुठे सापडणार ?"

---

# परिषद्-वार्ता

( चिटणीसांकडून )

**३६ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन** :—प्रस्तुत संमेलनाचें अधिवेशन ' महाराष्ट्र समाज ' या संस्थेच्या वतीने अहमदाबाद येथे दि. ३१ आक्टोबर व १–२ नोव्हेंबर १९५३ या अवधींत श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेने ' लोकहितवादी मंदिरां 'त यशस्वीरीत्या पार पडलें. दि. ३१ रोजीं सकाळीं प्रदर्शनाचें उद्घाटन श्री. विद्याबेन नीळकंठ यांच्या हस्ते करण्यांत आलें. संमेलनाचें उद्घाटन ना. दादासाहेब मावळंकर यांनी केलें. संमेलनाला जोडून ' संतवाङ्मय ' विषयक शाखासंमेलन डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या अध्यक्षतेने दि. १ नोव्हेंबरला भरलें होतें. दि. २ ला ' बोलपट व कथावाङ्मय ' या विषयावर श्री. के. नारायण काळे यांच्या अध्यक्षतेने खुली चर्चा झाली. म. म. प्रा. द. वा. पोतदार यांनी 'मराठी साहित्याचा इतिहासावर झालेला परिणाम' या विषयावर दिलेलें व्याख्यानहि सुश्राव्य झालें. याशिवाय संतवाङ्मयावरील खुली चर्चा, गरबानृत्य, भावगीत, नाट्यप्रयोग ( स्थानिक कलाप्रेमींनीं केलेला सत्तेचे गुलाम, मुं. म. सा. संघ-नाट्यशाखेने केलेले झुंजारराव–मानापमान, मेनां गुर्जरी ), श्री. मृणालिनी साराभाई यांचे नृत्य, काव्य-गायन, भाषाभगिनी संमेलन इत्यादि मनोरंजक व उद्बोधक कार्यक्रम झाले. संमेलन यशस्वी करण्याच्या कामीं ना. दादासाहेब मावळंकर, डॉ. ग. बा. मोहिले ( स्वागताध्यक्ष ) श्री. वसंत हेबळे ( कार्याध्यक्ष ), श्री. गो. के. नागराज, श्री. मो. श्री पंडित, श्री प्र. मा. जांभेकर, श्री. श्री. स. शेवडे इत्यादि लहानथोर कार्यकर्त्यांनी खूप श्रम घेतले त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे अल्प आहेत. ( संमेलनांत संमत झालेले ठराव याच अंकांत अन्यत्र दिले आहेत. )

**कै. माधव जूलियन स्मृतिदिन** :—रविवार दि. २९ नोव्हेंबरला कै. माधव जूलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त अमरावतीचे प्रा. भ. श्री. पंडित यांचें ' प्रणयपंढरीचा वारकरी ' या विषयावर व्याख्यान झालें. व्याख्यात्यांनी कै. माधवराव पटवर्धनांच्या प्राज्ञ व प्रतिभा वाङ्मयाचा सटीक परामर्श घेतला व प्रणयपंढरीचा वारकरी या विशेषणांत कुत्सितार्थ नसून गौरव आहे असें सांगितलें.

**वार्षिक वाङ्मय समालोचन माला** :—प्रतिवर्षाप्रमाणे प्रस्तुत माला ३० नोव्हेंबर ते ३ डिसेंबर या अवधींत गुंफण्यांत आली. यंदा काव्य ( प्रा. भ. श्री. पंडित ), कादंबरी ( प्रा. अ. के. भागवत ), नाटक ( श्री. माधव मनोहर ) व टीका ( प्रा. ग. प्र. प्रधान ) या चार विषयांवर समालोचनपर व्याख्यानें झालीं.

**प्राज्ञ-विशारद वर्ग** :—प्राज्ञ-विशारद वर्ग जुलै ते डिसेंबर १७ पर्यंत चालू होते. यंदाच्या वर्गात प्रा. श्री. म. माटे, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. गं. भा. निरंतर, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. रा. ना. गद्रे, डॉ. स. वि. सहस्रबुद्धे, प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. न. का. घारपुरे, डॉ. बा. मो. कानिटकर, श्री. प्र. न.

जोशी, श्री. व. दि. कुलकर्णी, श्री. प्र. शं. जोशी, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. ग. स. शुक्ल यांनी अध्यापन कार्य केलें.

विशेष साधारण सभाः—ही सभा अहमदाबाद येथे दि. १–११–५३ रोजीं श्री. वि. द. घाटे यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. मध्यभारत मराठी साहित्य संमेलनाकडून ‘परिषदेच्या व संमेलनाच्या’ नांवांत बदल करण्यासंबंधी जो ठराव आला होता त्यासंबंधीं चर्चा झाली व पुढील निर्णय घेण्यांत आला—‘महाराष्ट्र साहित्य परिषदेच्यावतीने भरणाऱ्या संमेलनाचें नांव मराठी साहित्य संमेलन असें असावें. महाराष्ट्र साहित्य परिषद् हें परिषदेचें नांव तसेंच पुढें चालू ठेवावें. संमेलनाच्या नांवांतील बदल ध्यानांत घेऊन घटनेंत योग्य त्या ठिकाणीं तसा बदल करावा.’ सभेंत पुढील संमेलनाच्या निमंत्रणांचा विचार होऊन दिल्ली मराठी साहित्य मंडळ या संस्थेचें निमंत्रण स्वीकारण्यांत येऊन १९५४ सप्टेंबरच्या सुमारास दिल्ली येथें जादा किंवा वार्षिक अधिवेशन घ्यावें असें ठरलें. त्याजबरोबर मराठी साहित्यमंडळ, पंढरपूर यांचेंहि निमंत्रण स्वीकारण्यांत आलें असून दिल्ली संमेलनानंतरचें संमेलन पंढरपूरला भरवावें असें ठरलें

कार्यकारी मंडळ सभाः—ही सभा १३-१२-५३ रोजीं होऊन तींत अहमदाबाद अधिवेशनांत संमत झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीविषयी विचार झाला. ठराव क्र. ७ च्या अंमलबजावणीसाठी पुढील तीन जणांची अुपसमिति नेमण्यांत आली. १ श्री. शं. रा. शेंडे (निमंत्रक), २ श्री. श्री. शं. नवरे (चिटणीस म. सा. प.), ३ बांसदा–धरमपूर विभागांतील अेक स्थानिक सभासद स्वीकृत करावयाचा. या समितीने आपला अहवाल परिषदेकडे सादर करावयाचा आहे.

कन्नड साहित्य संमेलनः—कुमठा (अुत्तर कॅनरा) येथें दि. २६-२७-२८ डिसेंबरला भरलेल्या ३६ व्या कन्नड साहित्य संमेलनासाठी परिषदेतर्फे प्रा. अ. गं. मंगरूळकर (पुणें), श्री. बा. रं. सुंठणकर (बेळगांव) व डॉ. वामनराव वाघ (कारवार) हे प्रतिनिधि म्हणून गेले होते.

कै. ब्लोक यांना श्रद्धांजलिः—सुप्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ कै. झुल् ब्लोक यांच्या निधनानिमित्त गुरुवार दि. २४ डिसेंबरला परिषदेच्या वतीने दुखवटा सभा झाली. अध्यक्षस्थानीं प्रा कृ. पां. कुलकर्णी होते. सभेंत डॉ. रा. ग. हर्षे, डॉ. प. ल. वैद्य, व श्री. डिसकळ यांनी कै. ब्लोक यांच्या कार्याविषयी माहिती सांगितली.

---

पुरवणी

# महाराष्ट्र साहित्य संमेलन

## ३६ वें अधिवेशन

अहमदाबाद ( दि. ३१ आक्टोबर व १-२ नोव्हेंबर १९५३ )

## संमेलनांत संमत झालेले ठराव

### ठराव १.

संमेलनाचें मागील अधिवेशन व हें अधिवेशन या दरम्यानचे कालावधींत मृत झालेल्या व्यक्ती पुढीलप्रमाणें आहेत:—

( १ ) आहिताग्नि शंकर रामचंद्र राजवाडे, पुणें; ( २ ) भास्कर वामन भट, धुळें; ( ३ ) म. म. कृष्णशास्त्री घुले; ( ४ ) राम एल्. गोगटे, मुंबई; ( ५ ) बा. ना. सहस्रबुद्धे, गोंदिया; ( ६ ) कै. भाऊशास्त्री वझे, बनारस; ( ७ ) गणपत बाळाजी बोरवणकर. ( ८ ) भगवंत रघुनाथ उर्फ बी. रघुनाथ कुळकर्णी, मराठवाडा; ( ९ ) र. धों. कर्वे, मुंबई; ( १० ) कै. यशवंतराव सरदेसाई, गोमंतक; ( ११ ) पं. ग. रं. वैशंपायन, पुणें; ( १२ ) कै. दत्ताफळ देसाई, गोमंतक.

साहित्य परिषदेचे सभासद, मराठी भाषेचे सेवक व मराठी वाङ्मयांत आपल्या लेखनाने भर घालणारे असे वरील गृहस्थ होते. त्यांच्या निधनाबद्दल हें संमेलन या ठरावाने दुःख व्यक्त करीत आहे.

सही : वि. द. घाटे.
अध्यक्ष
वसन्त हेबळे,
कार्याध्यक्ष.

### ठराव २.

(१) सर्व मराठी भाषिकांच्या सलग प्रदेशांचे भारतांतर्गत अेक अखंड मराठी प्रदेश राज्य स्थापन झाले पाहिजे अशी जनतेची निकराची मागणी आहे. भारत सरकारने प्रस्तुतच्या राज्यांची पुनर्घटना करण्याचे कामीं अेक श्रेष्ठाधिकार समिति नेमण्याचें घोषित केले आहे. या घोषणेचे ही सभा स्वागत करते.

(२) ही समिती अेकभाषिकांची सलग आणि स्वयंपोशित प्रदेशराज्यें निर्माण करण्यासाठीं सर्वांगीण चौकशी करील आणि तसे अधिकार तिला देण्यांत येतील अशी या संमेलनास आशा आहे.








(३) असा सलग महाराष्ट्र प्रदेश राज्यरूपानें नांदू लागल्याशिवाय मराठी भाषेचें न्याय्यक्षेत्र तिला लाभून मराठी साहित्याचें आणि मराठी भाषी जनतेचें ऊर्जित होणार नाही अशी ह्या संमेलनास दृढ श्रद्धा आहे.

(४) सांप्रत मराठी भाषिक प्रजा मराठवाडा, पश्चिम महाराष्ट्र, महाविदर्भ, आणि गोमंतक ह्या भिन्न शासित विभागांत विलगपण वाटली गेली असल्यानें, ती विकलांग आणि दुर्बल झाल्याचें स्पष्ट दिसत आहे आणि त्यामुळें भारताच्या उन्नतीला आवश्यक तें बळ मराठीभाषी प्रजांना देतां येत नाही ह्याचा या संमेलनास विषाद वाटतो.

(५) जेव्हां मराठी भाषिकांचें सलग एकराज्य स्थापन होईल तेव्हां येथील प्रजांचे शिक्षण, उद्योग, भरण–पोषण इत्यादि सर्व कार्यें ते राज्य उत्कृष्टपणें पार पाडीलच, इतकेंच नव्हे तर त्यामुळे भारताच्या अभेद्यत्वाला बळकटीहि आणील.

(६) भारताच्या संविधानांत अल्पसंख्यांकाना व अन्यभाषिकांना जीं जीं संरक्षणें दिली आहेत तीं तीं हा भावी महाराष्ट्र जबाबदारीने आणि संतोषपूर्वक पार पाडील. कोणावर कसलाहि अन्याय वा आक्रमण होणार नाही ह्याची काळजी वाहील.

(७) या भावी महाराष्ट्राची राजधानी मुंबई हीच असली पाहिजे. मुंबईची भूमी पूर्वीपासून मराठी भाषिकांची आहे. पुढें तिचा मोठा विस्तार होऊन तिला जें आजचें भव्य स्वरूप आलें आहे आणि तिच्या आश्रयाला विविध भाषिक समाज आले आहेत आणि त्या सर्वांनीं मुंबईच्या सौंदर्यांत व वैभवांत भर घातली आहे ह्याची संपूर्ण जाणीव भावी महाराष्ट्रराज्य ठेवील आणि मुंबईच्या वैभवांत भरच घालील असें खुलें आणि जाहीर आश्वासन हे संमेलन मन:पूर्वक देत आहे.

(८) मराठी भाषिक प्रजा आज मराठवाडामहाविदर्भादिक भिन्नशासित विभागांत वाटल्या गेल्या आहेत. त्यांचे एकीकरण करून त्यांना महाराष्ट्राच्या एक शासनाखालीं आणतांनां त्या त्या विभागांतील सर्व प्रजांचे हितसंबंध संपूर्णपणें सुरक्षित राखण्याची सर्वमान्य योजना सर्वांच्या संमतीने केली जाईल. या कामीं नागपूर कराराच्या साधनेने जे यश संपादन केलें आहे त्याचा या संमेलनास संतोष व अभिमान वाटतो.

सही : वि. द. घाटे
अध्यक्ष

सूचक : म. म. दत्तो वामन पोतदार
अनुमोदन : न. वि. गाडगीळ.

## ठराव ३.

सांप्रत स्थापन झालेल्या प्रादेशिक विद्यापीठांत शेजारील प्रदेशांतील भाषांच्या सन्मान्य शाखेसह पूर्ण अध्यापनाची व्यवस्था भाषाभगिनींचा स्नेहबंध दृढ होण्यासाठी आणि एकमेकांच्या विचारांची देवाणघेवाण होण्यासाठी त्वरित व्हावी अशी या संमेलनाची त्या त्या प्रादेशिक विद्यापीठांना विनंति आहे.

सही : वि. द. घाटे
अध्यक्ष

सूचक : श्री. म. माटे
अनुमोदक : म. म. द. वा. पोतदार

वसंत हेबळे
कार्याध्यक्ष








## ठराव ४.

बेळगांव व कारवार जिल्ह्यांतील जे विभाग सरकारनें द्वैभाषिक म्हणून जाहीर केले आहेत त्या भागांतील मराठीभाषी लोकांच्या नित्य व्यवहारांतील विविध अडचणी अद्यापि दूर झालेल्या नाहीत आणि सध्यांची जिल्हारचना अस्तित्वांत असेपर्यंत त्या दूर होण्याचा संभव नाही. म्हणून गेल्या शिरगणतीमध्यें निर्विवाद मराठीभाषी ठरलेल्या तालुक्यांचा एक स्वतंत्र जिल्हा करणें अत्यावश्यक आहे, असें या संमेलनाचें मत आहे. अशाप्रकारें स्वतंत्र जिल्हा करण्याला कालावधि लागणार असेल तर बेळगांव व कारवार जिल्ह्यांतील मराठी भाषिक भागांचें स्वतंत्र वेगळे तालुके तावडतोब करण्यांत यावेत आणि त्यावर वेगळा प्रांताधिकारी नेमण्यांत यावा.

तसेंच बेळगांव व कारवार जिल्ह्यांतील मराठी शाळांच्या बाबतींत होणारा अन्याय दूर करण्याकरितां या दोन्ही जिल्ह्यांतील मराठी शाळांसाठी स्वतंत्र विभाग ठेवण्यांत यावा व त्यावर वेगळा अधिकारी नेमण्यांत यावा.

अध्यक्ष
( सही ) वि. द घाटे

सूचक : श्री. शं. नवरे
अनुमोदक : ज. ना. कामत
वसंत हेबळे
कार्याध्यक्ष

## ठराव ५.

गुजरात विद्यापीठानें आपल्या अभ्यासक्रमांत मराठी विषयाचा समावेश केला ही गोष्ट अभिनंदनीय आहे. या विद्यापीठाच्या कक्षेंत रहाणाऱ्या मराठी भाषिकांची संख्या मोठी असून मराठी माध्यमांतून प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्याहि मोठी आहे. विद्यापीठानें मराठी विषयाचा स्वीकार केला हें खरें, परंतु त्या विषयाच्या सन्मान्य शाखेसह पूर्ण अध्यापनाची सोय विद्यापीठाला संलग्न असलेल्या कॉलेजमधून नसल्यामुळें मराठी माध्यमांतून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना कॉलेजमध्यें मराठी विषय घेतां येत नाहीं म्हणून सरकारी व खाजगी कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं आपापल्या कॉलेजमध्यें मराठी विषयाला स्वतंत्र प्राध्यापकाची नियुक्ति करावी व मराठी भाषिक विद्यार्थ्यांची ही अडचण दूर करावी अशी या संमेलनाची सरकारला व खाजगी कॉलेजच्या अधिकाऱ्यांना विनंति आहे.

अध्यक्ष
( सही ) वि. द. घाटे

सूचक : द. रा. शेवडे
अनुमोदक : का. रा. गुंजीकर
रा. ब. आठवले
वसंत हेबळे
कार्याध्यक्ष

ठराव ६.

कर्नाटक विद्यापीठाने बहि:शालेय व्याख्यानमाला कर्नाटक भागांत सुरू केली आहे ही अभिनंदनीय गोष्ट आहे. तथापि आतापर्यंत या मालेंत झालेली सर्व व्याख्यानें कन्नडमधून दिली गेलीं. त्यामुळे विद्यापीठाच्या कक्षेंत असलेल्या बेळगांव व कारवार जिल्ह्यांतील मराठी भाषिकांना त्यांचा फायदा घेतां आलेला नाही म्हणूनं ह्यी सभेची कर्नाटक विद्यापीठास अशी विनंती आहे कीं त्यांनी आपल्या बहि:शालेय व्याख्यानमालेंतील कांही व्याख्याने सदर विभागांकरितां मराठींतून देण्याची व्यवस्था करावी.

वि. द. घाटे,
अध्यक्ष
वसन्त हेबळे
कार्याध्यक्ष.

ठराव ७.

बांसदा व धरमपूर या संस्थानी प्रदेशांत जी मराठी भाषिक प्रजा आहे त्या प्रजेच्या भाषिक परिस्थितीची संपूर्ण चौकशी करून अहवाल तयार करण्यासाठीं हे संमेलन महाराष्ट्र साहित्य परिषदेस विनंती करीत आहे.

( सही ) वि. द. घाटे,
अध्यक्ष.
वसन्त हेबळे,
कार्याध्यक्ष.

अनुमोदक : शं. वा. रानडे
सूचक : शं. रा. शेंडे

ठराव ८.

पुणें नभोवाणी केंद्र भारत सरकारनें सुरू कल आणि अंशत: महाराष्ट्रीय जनतेची मागणी पुरी केली याबद्दल या संमेलनास संतोष वाटत आहे. लवकरच पांच किलोवॅट शक्तीच्या केंद्रांत पुणें केंद्राचे विकसन करण्याचें आश्वासन पूर्ण करण्यांत येईल अशी या संमेलनास आशा आहे. या केंद्रावरील कार्यक्रम सर्व मराठी भाषिक जनतेच्या आकांक्षा पूर्ण करणारे होतील अशी या संमेलनास आशा वाटते.

( सही ) वि. द. घाटे
अध्यक्ष
वसन्त हेबळे
कार्याध्यक्ष

सूचक : के. ना. काळे
अनुमोदक : चंद्रकुमार डांगे









**ठराव ९.**

आद्य पत्रकार व एक प्रमुख समाजसुधारक कै. बाळशास्त्री जांभेकर यांचे यथोचित स्मारक करण्याचे जे प्रयत्न चालू आहेत त्या प्रयत्नांना या संमेलनाचा हार्दिक पाठिंबा आहे आणि या कामीं आर्थिक साहाय्य करण्याची जनतेस विनंती आहे.

( सही ) वि. द. घाटे
अध्यक्ष.
वसन्त हेबळे,
कार्याध्यक्ष.

सूचक : वि. ह. आपटे
अनुमोदक : द. वा. पोतदार

**ठराव १०.**

मुंबई सरकारनें नुकतेच, विविध उपायांनीं नाट्यकलेला उत्तेजन देण्याचें आपलें धोरण जाहीर केलें आहे त्याबद्दल हें संमेलन त्याचे अभिनंदन करीत आहे. मात्र हें धोरण अंमलांत आणण्याच्या योजनेंत या कलेंतील अनुभवी लोक किंवा संस्थांचें प्रतिनिधी यांचा समावेश करावा.

पण त्याबरोबरच नाट्यप्रयोगावरील करमणुकीचा कर रद्द करण्याबद्दल त्यांनीं आपली जी अनिच्छा प्रगट केली आहे. तिची कारणें स्पष्ट होत नसल्यामुळे त्यांनीं आपल्या या निर्णयाचा फेरविचार करावा व नाट्यव्यवसायाच्या व कलेच्या धारणेच्या व उन्नतीच्या दृष्टीनें आजच्या परिस्थितींत अत्यंत आवश्यक असलेली ही मदत त्यांना द्यावी. तसेंच सध्यां ज्या धोरणानें कांहीं नाटकावरील करमणूक कर माफ करण्यांत येतो तें धोरण नाट्यकलेस उपकारक नसल्यामुळें ते बदलून सर्वच नाटकांना कर माफ करावा अशी या संमेलनाची त्यांना आग्रहाची विनंती आहे.

त्याचप्रमाणें नाट्यप्रयोगासाठी आवश्यक असणारी नाट्यगृहें बांधण्याबाबत ते कांहीं योजना तयार करीत आहेत हे अभिनंदनीय आहे. पण ती योजना अंमलांत येईपर्यंत नाट्यप्रयोगासाठी म्हणून बांधली गेलेली जीं नाटकगृहें अन्य उपयोगासाठीं वापरली जात आहेत ती नाट्यप्रयोगासाठीं पुन्हां उपलब्ध होतील अशी तजवीज करण्यांत यावी अशी या संमेलनाची सरकारला विनंती आहे.

( सही ) वि. द. घाटे,
अध्यक्ष
वसन्त हेबळे
कार्याध्यक्ष

सूचक : पार्श्वनाथ अळतेकर
अनुमोदक : के. ना. काळे

अनुक्रमणिका



# साभार स्वीकार

(ग्रंथनाम, लेखक, प्रकाशक व मूल्य)

१. पांच नाटिका:—गंगाधर गाडगीळ; पाप्युलर बुक डेपो, मुंबअी ७; १॥ रु.

२. गृहवैद्य अथवा क्षारचिकित्सा:— र. कृ. गर्दे. सौ. लीला गर्दे, ६३ शुक्रवार, पुणें २; ३ रु.

३. भावनाकोश (गृहवैद्य पुरवणी):— र. कृ. गर्दे; सौ. लीला गर्दे, ६३ शुक्रवार, पुणें २; ८ आणे.

४. पैसा:—(अर्थशास्त्र) सी. पं. खेर; महाराष्ट्र ग्रंथ भांडार; कोल्हापूर, ४॥ रु.

५. आमचे नेताजी:-दा. वि. कुलकर्णी; महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; १ रु.

६. झम्मन (कथा):—ग. भि. जोशी; के. भि. ढवळे, मुंबअी २; २॥ रु.

७. सदाफुली (शिशुगीतें):—भ. श्री. पंडित; के. भि. ढवळे, मुंबअी २; ।=

८. चिवचिव (शिशुगीतें)– के. नारखेडे; के. भि. ढवळे, मुंबअी २; ।=

९. ताअी तेलीण (नाटक):— वि ना. कोठीवाले; नेर्लेकर बुकसेलर्स, पुणें २; १ रु

१०. आधुनिक सुधारकः-श्री.म. माटे, दी टीचर्स आयडिअल पब्लि. हाअूस लि. शनिवार, पुणें २; १४ आणे.

११. तुकाराम भक्तीचा डांगोरा:— ग. वि. तुळपुळे; अध्यात्म विद्या मंदिर, सांगली, ३॥ रु.

१२. शितू (कादं.):—गो. नी. दांडेकर, मौज प्रकाशन, मुंबअी ४; ४ रु.

१३. श्री. ज्ञानेश्वर-वाङ्मय आणि कार्य:—न. र. फाटक; मौज प्रकाशन, मुंबअी ४; ५ रु.

१४. श्री. रामदास-वाङ्मय आणि कार्य न. र. फाटक; मौज प्रकाशन, मुंबअी ४; ७॥ रु.

१५. क्षमेसाठीं अपराध (नाटिका):– ना. सी. फडके; स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल; कोल्हापूर; ।=.

१६. अर्धमागधी वाङ्मय प्रवेश:— श्री. र. भिडे; स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; १॥ रु.

१७ पाकळ्या (कथा) वि स. खांडेकर; स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; १॥ रु.

१८. हिंदुस्थानची सामाजिक अुत्क्रांति द. रा. कानेगांवकर; दा. ना. मोघे, कोल्हापूर; २ रु.

१९. मायमाअुली (नाटक):—ला. कृ. आयरे; वसुंधरा प्रकाशन, मुंबअी २७; १॥ रु.

२०. थिऑसफी व जनतेच्या दारिद्र्याची हकालपट्टी–रा. स. भागवत; मराठी थिऑ. फेडरेशन, पुणें ४; ४ आणे.

२१. पंख (कादं.)—वसंत कानेटकर; पाप्युलर बुक डेपो, मुंबई ७; ३ रु.

२२. स्वतंत्र भारताची पहिली पंचवार्षिक योजना–भा. म काळे; बापट आणि कं. मुंबई २; ·।॥·

२३. केशभूषा शास्त्र आणि तंत्र–नंदन कालेकर; ओ. के. हेअर ड्रेसिंग सलून, मुंबई ४; २॥ रु.

२४. कण आणि क्षण–श्री. वा. काळे, दुर्गानिवास, पुणें ४; २॥ रु.

२५. ज्ञानोत्तर प्रेमभक्ति–श्री. ज्ञानेश्वर माऊलीचा एक चरणरज; आ. सु. पाटील, नागझरी (विदर्भ); ३। रु.

## साभार-स्वीकार

२६. स्वप्नलहरी—( कविता-माधव-जूलियन ) — संपा. गिरीश; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; २॥ रु.

२७. सप्तसरिता ( कविता-७कवयित्री ) संपा. मालती किर्लोस्कर; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ३ रु.

२८. मधुधारा ( लेखसंग्रह )-गो. के. भट; मॉडर्न बुक डेपो, पुणें २; ३ रु.

२९. सोवत ( कथा )-ना. सी. फडके; अंजलि प्रकाशन लि, मुंबई १; २ रु.

३०. सितारा मंझिल—( कादं. ) ना. सी. फडके; अंजलि प्रकाशन लि, मुंबई १; ४ रु.

३१. इभ्रत ( कांद. )-स. शं. देसाई; रामकृष्ण प्रकाशन मंडळ, दादर; ३॥ रु.

३२. रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें! पु. रा. लेले; के. भि. ढवळे, मुंबई २; १ रु.

३३. सुधाकरकर्ते आगरकर — दा. न शिखरे; के. भि. ढवळे, मुंबई २; ·॥·

३४. नामदार गोखले— दा. न शिखरे; के. भि. ढवळे, मुंबई २; ·॥·

३५. नाटयाचार्य खाडिलकर—दा. न. शिखरे; के. भि. ढवळे, मुंबई २;

३६. शीखांचे गुरु-र. ल. उपासनी, के. भि. ढवळे, मुंबई २; ·॥=

३७. नऊ नाथ—भा. श्री. परांजपे; के. भि. ढवळे, मुंबई २; ·॥·

३८. निळें कमळ—वा. गो. नाईक; के. भि. ढवळे, मुंबई २; ॥=

३९. हृदयाची हांक ( सं. आवृत्ति )- वि. स. खांडेकर, संपा. पु. रा. लेले; के. भि. ढवळे, मुंबई २; १· रु.

४०. नाटयछटा व संवाद- के. गो. पंडित. के. भि. ढवळे, मुंबई २; ·॥·

४१. जरा आंवती भोवती-लीला रेळे; मुंबई २; ·॥·

४२. संजूचें स्वप्नः—ना. द. गाडगीळ, के. भि. ढवळे, मुंबई २; ·॥·

४३. जोग-कुल-वृतान्तः— संपा. शं. रा. कानिटकर; चिं. वि. जोग, बँक ऑफ महाराष्ट्र लि. पुणें २; १० रु.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें